# आरंभ

---

या पानावर या वर्णनाचा पहिला शब्द आहे म्हणूनच याला 'आरंभ' म्हणायचं. नाहीतर या गोष्टीला आरंभही नाही, मध्यही नाही आणि शेवटही नाही. आणखी एक, पुरातन संस्कार म्हणून आजची सर्वमान्य तारीख देतो - १० जुलै १९८७. गोष्टीच्या दृष्टीने या तारखेला काही महत्त्व नाही... ती ख्रिस्तपूर्व सन ५००० मध्येही घडू शकेल किंवा इसवी सन ८००० मध्येही घडू शकेल. केवळ माझा त्यात एक निवेदक म्हणून संबंध येतो म्हणून माझं नाव देतो... श्रीहरी मायदेव. मला तर यथे सर्वात कमी महत्त्व आहे... मी म्हणजे एका तबकडीवर फिरणारा काटा आहे. एखाद्या ध्वनियंत्रातलं साऊंडहेड आहे... माहिती प्रसारित करण्याचं एक साधन. मला शक्य असतं तर मी हे कार्य टाळलं असतं... पण ते मला शक्य नाही. दिक्पाल आर्यने माझ्याजवळ ते चोपडं दिलं आहे. पुन्हा मला तो भेटलाच

नाही... म्हणजे बोलण्याच्या अवस्थेत... तसा तो सर्वांसमोरच होता... त्याने आत्महत्या केलेली होती... तेव्हा मग माझा नाइलाज झाला.

पण हे सगळं चुकीचं आहे, गुंतागुंतीचं आहे. मी कोण, पालशी माझा काय व कसा संबंध आला हे प्रथमपासूनच सांगायला हवं.

मी सॅटेलाइट टेक्निशियन आहे आणि गेलं वर्षभर मार्स बेस (मंगळतळ) नं. २ वर काम करीत आहे. पाल ॲस्ट्रोपायलट होता. गंगेच्या पात्रातली दोन लाकडं पुन्हा एकदा आफ्रिकेच्या किनाऱ्यावर एकत्र येणं हे जितकं असंभवनीय तितकीच आमची मंगळतळावरची भेट अशक्य कोटीतली होती. एका कॉलेजात शिकलेले आम्ही दोघं पृथ्वीच्या वर, हजारो मैलांवर, अंतराळात तरंगणाऱ्या मंगळतळावर अचानकपणे भेटलो होतो. पालला खराखुरा आनंद झालेला दिसला. त्याच्या सहवासात दिसणं ही सुद्धा मला एक अभिमानाची गोष्ट वाटली... कारण चौदा स्पर्धकातून पालची मंगळयानाचा वैमानिक म्हणून एकमताने निवड झाली होती...

पुन्हा एकदा निवेदनाचा धागा हातून सुटला आहे. याच्याही आधीपासून सांगायला सुरुवात करायला हवी. १९७४ साली युनोतर्फे 'टेक्निकल सिस्टीमस् फाऊंडेशन' सुरू झालं. अवकाशयानांची बांधणी, चाचणी, आंतरिक्ष तळांची आखणी, बांधणी, उभारणी आणि व्यवस्था, आंतरिक्ष वैद्यक शास्त्र, या सर्वांतील तज्ज्ञांची उणीव भरून काढण्यासाठी ही संस्था आंतरराष्ट्रीय सहकार्याने स्थापन झाली. प्रवेशाचा कस केवळ गुणवत्तेवर ठरत होता. जगातील यच्चयावत लोकांना या संस्थेची द्वारं खुली होती. जो तो आपापल्या कलाप्रमाणे आपलं भवितव्य ठरवीत होता.

इलेक्ट्रॉनिक्स आणि टेलिकम्युनिकेशन या दोन शाखांकडे माझा प्रथमपासूनच कल होता. मलाही संस्थेत प्रवेश मिळाला... पण त्यासाठी अत्यंत प्रखर अशा आंतरराष्ट्रीय स्पर्धेला तोंड द्यावं लागलं. पालचा स्वभाव माझ्याहून वेगळा. तो धाडसी, हरहुन्नरी, हजरजबाबी, प्रसंगावधानी... त्याचं उद्दिष्ट वेगळं होतं... आंतरिक्ष वैमानिक होण्याचं! तेव्हा आमचे मार्ग फार पूर्वीच भिन्न झाले होते... पण त्यालाही यश मिळालं.

प्रमाणपत्र मिळाल्यावर मला दोन वर्षं पृथ्वीवर, मग दोन वर्षं

मूनबेस (चंद्रतळ... आता मंगळतळ नं. १) वर रहावं लागलं आणि आता मी मंगळतळ नं. २ वर होतो. तेथेच दिक्पाल आर्यची भेट झाली.

शेवटच्या क्षणापर्यंत त्याची निवड गुप्त ठेवण्यात आली होती. एका वेगळ्याच विश्वात वावरणारे आम्ही-आम्ही आमचं संकुचित राष्ट्रीयत्व केव्हाच विसरलो होतो... पण पृथ्वीवर राहणाऱ्या पाचशेतीस कोटी भूमीबद्ध लोकात ती विश्वबंधुत्वाची भावना अजून क्षीण होती. त्यांच्यात राष्ट्रीय मानापमानाच्या कल्पना अजून प्रखर होत्या.

पृथ्वीवरील मानवांचा प्रतिनिधी म्हणून जाण्याचा प्रथम मान मिळणे ही खरोखरच मोठी भूषणावह गोष्ट होती. हा कार्यक्रम जाहिर झाला तेव्हा याच एका गोष्टीला अवास्तव प्रसिद्धी मिळाली होती; पण त्यांना ही गोष्ट माहीत नव्हती की पृथ्वीकक्षेबाहेर प्रथम पाऊल टाकणारा हा पहिला मानव विलक्षण व अकल्पित आव्हान स्वीकारीत होता. त्यांना हेही माहीत नव्हतं की शेवटच्या पातळीवरची निवड ही संपूर्ण यांत्रिक पद्धतीने, गणनयंत्राच्या सहाय्याने होत होती... अर्थात् आता सर्व काही जगजाहीर झालं आहे, रागलोभ मिटले आहेत...

'दिक्पाल आर्य' हे नाव जाहीर झालं आणि मला आनंदाचा आणि अभिमानाचा एक मोठा सुखद धक्का बसला. आपला पाल ! जेव्हा तो तळावर उतरला त्यावेळी माझ्या मनाची तयारी झालेली होती... पण त्याला मात्र माझी भेट संपूर्ण अनपेक्षित होती. काही वेळ तो माझ्याकडे नुसता पाहतच राहिला आणि मग मोठमोठ्याने हसून म्हणाला, 'वेल ! वेल ! इटस् ए स्मॉल युनिव्हर्स, ए, श्री ?'

मी पालचं मन:पूर्वक अभिनंदन केलं. मला वाटतं मला पाहून त्याला खरोखरीच फार आनंद झाला. माझा हात घट्ट धरून तो म्हणाला, 'श्री ! अगदी एखादं घरचं माणूस भेटल्यासारखं वाटतं रे ! माझी कल्पना नव्हती तू इथे असशील !'

आणि त्याच्या बावन्न तासाच्या मुक्कामातला जेवढा वेळ मोकळा मिळाला तेवढा आम्ही दोघांनी एकमेकांच्या सहवासात काढला.

'मार्स विंडो' उघडी असतानाच मंगळावर जाणं शक्य होतं. अर्थात् सुरुवातीस पालच्या यानाचा वेग ताशी तीस हजार मैलाहूनही जास्त होता. त्यात पुढे भर पडत जाणार होती. नवीनच बांधण्यात आलेला फोटो-न्युक्लिऑनिक ड्राइव्ह त्याच्या यानाला बसवण्यात आला होता. मानव आंतरिक्ष प्रयोगशाळा वापरायला लागल्यावरच मग त्याच्या प्रयोगाचं क्षेत्र विस्तीर्ण झालं होतं, आणि त्या प्रयोगातच त्याच्या हाती एलीमेंट नं. २३८ लागलं होतं. केवळ संपूर्ण पोकळीतच हे द्रव्य रासायनिक स्थिरता राखू शकत होतं तेव्हा त्याची निर्मिती आणि साठा केवळ उपग्रहांवरच शक्य होता...

पण या तांत्रिक बाबी मी सांगत बसण्यात अर्थ नाही. कारण माझ्यापेक्षा समर्थ लेखकांनी जगातील सर्व जनतेला त्याचं सुबोध आणि रसाळ वर्णन ऐकवलंच आहे. त्याप्रमाणे दिक्पाल आर्य त्याच्या त्या ऐतिहासिक प्रवासावर निघाला त्यासंबंधीही मी काहीच लिहीत नाही. जगातील बहुतेक सर्वांनी टेलिव्हीजनवर ते पाहिलंच आहे, त्याची चलत्चित्रं बहुतेकांनी पाहिलीच आहेत, निदान स्थिरचित्रं तरी जगावरच्या प्रत्येक कोपऱ्यापर्यंत पोहचलेलीच असली पाहिजेत...

दिक्पाल आर्य त्याच्या केबिनमध्ये शिरला, केबिन बंद झाली, रेडिओ संपर्क चालू झाला, आणि ठराविक क्षणी त्याचं यान अलिप्त झालं, आणि पाहता पाहता दूर झालं... आम्ही सर्वजण आधी साध्या डोळ्यांनी आणि मग टेलीस्कोपमधून त्या यानाकडे पाहत होतो... जवळ असताना ते एखाद्या प्रचंड सुवर्णपक्ष्यासारखं दिसत होतं... आणि लहान होत होत मग शेवटी अथांग काळ्या आकाशपटावर ते एखाद्या सोनेरी ठिणगीसारखं दिसत होतं... आणि मग शेवटी ते इतर अनंत ताऱ्यात मिसळून गेलं... त्याची खूण राहिली ती ऑसिलोग्राफच्या तबकड्यावर फिरणाऱ्या हिरव्या रेषात, रेडिओवरच्या पालच्या आवाजात, टेलीमेट्रीक इंस्ट्रूमेंटमधून सरकणाऱ्या मॅग्नेटिक टेपवर...



मंगळतळ दोनची एकूण स्ट्रेंग्थ साठ लोकांची होती. लहानसहान

भेद वगळून सुद्धा सतरा राष्ट्रांचे नागरिक हे एक सामूहिक जीवन जगत होते. पृथ्वीवर सर्वच राष्ट्रे काही भावाभावासारखी वागत नव्हती, तशी अपेक्षा करणंही अव्यवहारी होतं; पण आमच्यापुरतं बोलायचं झालं तर आम्ही एका वेगळ्याच संस्थेचे घटक झालो होतो. हा काळा, हा गोरा, हा तपकिरी, हा पिवळा असले भेद तिथे नव्हते. निवड होतानाच सर्वांची किमान बौद्धिक पातळी अत्यंत वरच्या दर्जाची असल्याचं सिद्ध झालं होतं. एका गौरकाय वृत्तनिवेदकाने येथे दोन आठवडे राहून खाली गेल्यावर आमचं वर्णन 'ए सेमीप्लॅटोनिक, टोटली अॅमॉरल, हायली इंटेलिजन्ट, बेसिकली डीसेंट कम्युनिटी' असं केलं होतं. मला वाटतं यात सारं काही आलं. ती संध्याकाळ मला चांगली आठवते. ऑफड्यूटीवरचे सर्वजण लाऊंजमध्ये जमले होते. नेहमीपेक्षा खूप मोठ्याने (आणि बऱ्याच खालच्या पातळीचे) विनोद बरेच झाले, कडक पेयांचा खप नेहमीपेक्षा जवळजवळ दुप्पट झाला...

उपकरणांची अचूक आणि सूक्ष्म नजर पालच्या यानावर सर्वत्र होती. केवळ बाहेरूनच नाही, तर आतल्या अंगप्रत्यंगापर्यंत यानाची प्रत्येक हालचाल, आतील उपकरणांचं लहानसहान कार्य, एवढंच नाही पालचं शारीरिक तापमान, रक्तदाब, नाडीचा वेग, श्वासोश्वासाची क्रिया, मेंदूतील विद्युत प्रवाह सारं काही नोंदलं जात होतं. दर तासाने (झोपेच्या तीन तासाच्या चार पाळ्या सोडून) पालचा आवाजही रेडिओवर येत होता, मुद्रित केला जात होता.

तेही सर्व लगोलग पृथ्वीवर क्षेपित केलं जात होतं आणि तेही सर्व कोट्यावधी लोकांनी वाचलंच आहे. दिक्पालने घेतलेला कंकणाकृती सूर्यग्रहणाचा फोटोही (रंगीत) आमच्यापर्यंत पोहचला, तो वर्तमानपत्रातून आला, अमेरिकन अॅमॅच्युअर फोटोग्राफिक सोसायटीने दिक्पालला पहिलं बक्षीसही जाहीर केलं...

पण एक गोष्ट मात्र कोणाला कळत नव्हती, पाल परत आल्याखेरीज कळणारही नव्हती. या अपरिचित, अनंत प्रवासावर निघालेल्या पालला स्वत:ला काय वाटत होतं ? त्याच्यात कोणती मानसिक जडणघडण होत होती ? त्याच्यात कोणती स्थित्यंतरं होत होती ? तो परत

आल्याशिवाय यापैकी कशाचंही उत्तर आम्हाला मिळणार नव्हतं.

***

पालच्या ऑपरेशनचा शेड्यूल असा होता. मंगळावर उतरल्यावर त्याने सेक्स्टंटच्या व इतर उपकरणांच्या सहाय्याने स्थानिक वेळेची नोंद करायची, यानातली भौतिक व रासायनिक मापन करणारी काही यंत्रं सुरू करावयाची मग स्वत: बाहेर पडायचं. त्याला तेवीस दिवस पुरेल इतका अन्न व पाणी यांचा साठा त्याने स्वत:बरोबर घ्यायचा आणि बरोबर ३६० तासांनी यानाकडे परत यायचं. परत आल्याची बातमी आम्हाला द्यायची आणि मग परतीचा प्रवास सुरू करायचा. गति, दिशा इत्यादीतला बारीकसारीक तपशील सुधारून घ्यावयाचं काम स्वयंचलित यंत्रावर होतं...

पालचं यान मंगळावर बरोबर २५९ दिवसांनी पोहचले. अजूनपर्यंत तरी कोणताही यांत्रिक बिघाड झाला नव्हता. पाल यानाबाहेर पडला. त्याचा शेवटचा संदेश असा होता...

'आसपास रेताड वाळवंट दिसत आहे. आकाश हिरवट रंगाचं आहे. गवत, झुडुपं... कशाचीही खूण दिसत नाही. बाहेर तपमान उणे सहा डिग्री सेंटीग्रेड आहे... किंचित हलणाऱ्या धुलीकणांवरून अगदी मंद वारा वहात असावा असं वाटतं... मी आता बाहेर पाय ठेवणार आहे... आणि माझं काळीज धडधडत आहे... निर्विकार यंत्र सुरू झाली आहेत, ती आपलं काम करीत आहेत... पण मी, एक मानव, निर्विकार नाही... माझी कल्पनाशक्ती दौडत आहे... बाहेर काय असेल...? आता तर्कांची जरूरी नाही... प्रत्यक्षच दिसणार आहे. पृथ्वीवरच्या सर्व मानवांनो, परत येईपर्यंत माझा नमस्कार.'

आणि तो यानाबाहेर पडला...

यंत्रांकडून संदेश येत होते; पण यंत्र म्हणजे केवळ स्टेज प्रॉपर्टी होती. रंगपटावरचा नायक निघून गेल्यावर त्यांना काय महत्त्व होतं? त्यांचे निर्जीव संदेश येत होते, नोंदले जात होते, अभ्यासलेही जातील... पण कोणाचं तिकडे लक्ष नव्हतं. सर्वांच्या डोळ्यांसमोर एकच आकृती होती. यानातील टेलीमेट्रीक कॅमेऱ्याने पाठवलेला दिक्पाल आर्यचा शेवटचा

फोटो... स्पेससूटमध्ये वेष्टिलेली, सावकाश पावलं टाकणारी, एक पाठमोरी आकृती...

तो आता बाहेर पडला होता. मानवाने कधीही न पाहिलेल्या भूभागावरून चालत एका अज्ञात जगात गेला होता.

***

पुढचे पंधरा दिवस आम्ही सर्वच एका टांगत्या मन:स्थितीत होतो. मंगळावर काय घडत असेल याबद्दल तर्क लढवत बसण्याखेरीज आमच्या हाती काहीहि नव्हतं. काहींनी त्यावर कोट्याही केल्या...

'पालची एखाद्या डेझर्टब्युटीशी गाठ पडेल का रे ?' आणि त्यावर, 'उणे ५ सेंटीग्रेडला प्रेमही गोठलेलंच असणार !' इ. इ.

पालचे ३६० तास भरत आले तशी उत्सुकता शिगेस पोहचली. यानाबाहेर टेलिव्हिजन कॅमेरे रोखलेले होते... आसपासचा सपाट, रेताड पृष्ठभाग त्यात स्वच्छ दिसत होता... ३६० तास ही पालची अंतिम मर्यादा होती. त्या आधीच तो कॅमेऱ्यात दिसायला हवा होता...

आणि दिक्पाल आर्य आला नाही.

३६० तास, ३६१, ३६२, ३६३...

पंधरा दिवस, सोळा, सतरा, अठरा, एकोणीस...

त्याला काहीतरी झालं होतं. सूटमध्ये एखादा दोष ? एखादा लहानसाच पण परिणामी भयंकर अपघात ? किंवा... किंवा... कोणाकडून हल्ला...?

आम्ही काहीच करू शकत नव्हतो. आमचा संबंध फक्त त्या यानापर्यंतच पोहचत होता; पण पाल बाहेर होता... विशाल, अनोळखी, अपरिचित मंगळ ग्रहावर कोठेतरी... एकटा...

आजवर कोणताही मानव कधीही राहिला नसेल इतका एकटा...

दिक्पाल आर्यच्या प्रवासाला आधीच जगभर इतकी प्रसिद्धी मिळाली होती की तो परत आला नाही ही गोष्ट लपवून ठेवणंच अशक्य होतं. आंतरिक्ष साहसात आजवर अनेकांचे बलिदान झालं होतं; पण या खेपेस त्यात एक वेगळीच आर्तता होती. मी जास्त वर्णन करीत नाही.

***

मनात दारुण निराशा होती, तरीही आम्ही टेलिव्हिजन कॅमेऱ्याची रेताड चित्रचौकट सारखी नजरेखाली ठेवत होतो. वास्तविक आता आशेलाही अर्थ नव्हता. पालजवळचं अन्नपाणी केव्हाच संपलेलं असणार. त्या थंड, ओसाड, निर्जीव वाळवंटात तो कोठेतरी तळमळत असणार...

पाल यानाबाहेर पडल्याच्या एकेचाळीसाव्या दिवशी ऑब्झर्व्हेशन रुममधून कोणीतरी मोठ्याने ओरडलं...

'पाल येतोय ! पाल येतोय ! कॅमेऱ्यावर दिसायला लागलाय !'

क्षणभर सर्वजण हतबुद्ध झाले आणि मग सर्वांनी त्या खोलीकडे धाव घेतली. नशीबाने मी सुरुवातीस पोहचणारामध्ये होतो आणि मला अगदी जवळची जागा मिळाली होती. मला सर्व काही अगदी स्पष्ट दिसत होतं. कमांडरला कोणीतरी विचारलं,

'सर, अर्थ रीले सुरू करू का ?'

कमांडर ताबडतोब म्हणाले, 'नको ! इथे काहीतरी घोटाळा आहे... काय प्रकार आहे तो आपण आधी पाहू... तोपर्यंत सर्व रेकॉर्ड करून घ्या.'

पण एव्हाना सर्वांचंच लक्ष समोरच्या बारा बाय चौदाच्या काचेवर खिळून राहिलं होतं. दूरवर पसरत गेलेल्या करडट रंगाच्या ओसाड मैदानावरून एक मानवी आकार सावकाश सावकाश जवळ येत होता. मधेच एकदा त्याने मान वर केली... हालचाल फारशी शक्यही नव्हती... पण तेवढ्यात स्पेससूटच्या पुढच्या काचेवर फिकट सूर्य लख्कन चमकून गेला... रखडत्या पावलांनी तो आकार जवळ येत होता, मोठा होत होता... माझ्या मनात एक भयंकर शंका आली (इतरांच्या आली असलीच पाहिजे ) हा येत आहे हा खरोखर कोण आहे ? पालच आहे का ?

तो जवळ आला; यानाच्या दारापाशी थांबला; मग त्याने पोर्टच व्हाल्व्ह उघडला आणि तो यानात आला. आतल्या कॅमेऱ्यांनी आता त्याचं चित्रण सुरू केलं. त्याने बाहेरचं दार बंद केलं; केबिन हवाबंद केली आणि मग अंगावरचा स्पेससूट सावकाश सावकाश उतरवला.

रेडिओ इंजिनियरचं बोट संदेश देणाऱ्या बटणावर होतं; पण कमांडरने आज्ञा दिल्याखेरीज तो काही करणार नव्हता. कमांडर मोठ्या

विचारमग्न चेहऱ्याने काचपट्टीतल्या आकृतीकडे पाहत होते.

'आपण जरा थांबू या...' ते शेवटी म्हणाले, 'तो काय करतो हे पाहू आणि मग संदेशन सुरू करू या...'

अवजड स्पेससूट शरीरावरून निघाल्यावर पालला जरासं हलकं वाटलसं दिसलं... तो पालच होता अशी माझी पहिल्या नजरेतच खात्री पटली होती. कितीतरी वेळ तो कॅमेऱ्याकडे पाठ करूनच उभा होता आणि मग तो सावकाश स्वत:भोवती फिरला. त्याची नजर यानातल्या सर्व साधनांवरून, सर्व उपकरणांवरून फिरत होती. ती कॅमेऱ्याच्या लेन्सवरूनही गेली... एक क्षणभर त्याने आमच्या सर्वांकडे पाहिलं...

ती त्याची एक नजर ! एखाद्या सूळासारखी माझ्या काळजात खोलवर शिरली... एक नजर ! एक हरवलेला आत्मा ! एक हताश जीव !

पाल सगळीकडे पाहत होता, स्वत:चे हात वर उचलून त्यांच्याकडे पाहत होता. स्वत:च्या चेहऱ्यावरून हात फिरवित होता. यानाला स्पर्श करीत होता. याला झालंय तरी काय ? मला वाटलं.

'राइट !' कमांडर म्हणाले. 'आदेश पाठव !'

इंजिनियरने ऑडीओ सर्किट सुरू केलं. तो माइकमध्ये बोलू लागला.

'अटेंशन ! मार्स बेस टू कॉलिंग मेजर आर्य ! मार्स-बेस टू कॉलिंग मेजर आर्य ! रिपोर्ट ! ओव्हर...'

केबिनमध्ये एकदम आवाज उमटला असला पाहिजे कारण पाल केवढ्यांदा तरी दचकला, घाबरून आसपास पाहू लागला व मग त्याची नजर डॅशबोर्डवरच्या जाळीदार स्पीकरकडे गेली. तो गोंधळून गेला होता यात शंकाच नाही. बाहेरच्या प्रत्येक घडामोडीचा तो ओळीने आणि सावकाश अर्थ लावत होता, त्याच्या प्रतिक्रिया अत्यंत मंद होत्या; पण शेवटी त्याला सर्व अर्थ उमगला व तो केबिन रेडियोकडे गेला. बोर्डवरचं टॉगल त्याने हलवलं व तो बोलू लागला...

'मेजर दिक्पाल आर्य रिपोर्टींग फ्रॉम शिप एम्. एस्. वन सर. मार्स मिशन कंप्लीटेड सर. वेटींग फॉर ऑर्डर्स. ओव्हर.'

'राइट. काँग्रॅच्युलेशन्स, मेजर आर्य.' कमांडरनी आता माईक

हातात घेतला होता. 'पॉल, कसं काय आहे सगळं ?'

'व्यवस्थित आहे सर.' पण त्याचा आवाज ! किती वेगळा !

'आर्य; तू थकलेला दिसतोस... सगळं ठीक आहे ना ?'

'यस सर.'

'तुला फिट वाटतंय ? परतीचा प्रवास व्यवस्थित करू शकशील?'

'परतीचा प्रवास ? ओ... ओ... यस सर ! सर्टनली सर !' पुन्हा एकदा ती भकास नजर आणि तो थकलेला आवाज.

'मेजर आर्य, आर यू शुअर ? कमांडरनी जरा रागाने विचारलं.

'यस सर !' पालच्या आवाजात आताशी जरा जोर आला होता.

'राइट ! प्रोसीड टू ऑपरेशन रिटर्न !' पालने डॅशवरची यंत्रं सुरू केली. तिथून आवश्यक ती माहिती आमच्या कॉम्प्युटरला मिळत होती. पहिला फ्लाइट शेड्यूल आता निकामी झाला होता. पृथ्वी, मंगळ, सूर्य यांच्या आताच्या जागा, एकमेकांचे सापेक्ष वेग, या साऱ्याचा विचार करून पालसाठी नवा मार्ग आखायचा होता...

एम्. एस्. वन वरचा लहानसा कॉम्प्युटर आणि आमचं जंगी यंत्र यांच्यात माहितीची देवाण-घेवाण झाली. आम्ही मानव या बाबतीत अज्ञानी व मंदबुद्धीचे होतो. सेकंदाला एक लाख शहाऐंशी हजार मैल या वेगाने त्यांच्या मंडळातून वीज धावत होती... त्याच गतीने शेकडो पर्याय तपासले जात होते... त्यातला एक निश्चित केला गेला... डॅशवर एक हिरवा दिवा लागला. यानाच्या डॅशबोर्डमधून एक कागदी पट्टी बाहेर पडत होती. यान सुरू करताना काय काय करायचं, सुरुवातीचा चार्ज किती, गायरोची दिशा कोणती... याची माहिती त्यावर दिली होती.

प्रश्न एवढाच होता, हे सर्व समजण्याच्या मन:स्थितीत आता पाल होता का ? शेवटी मानवच दुबळा ठरण्याचा संभव निर्माण झाला होता !

पण एव्हाना पाल सावरला होता. त्याच्या हालचाली प्रमाणशीर आणि झटपट व्हायला लागल्या होत्या. वर्षानुवर्षांचं कडक प्रशिक्षण आता आपला प्रभाव दाखवीत होतं. कमांडरसाहेबांच्या चेहऱ्यावरची चिंता बरीचशी निवळली. त्यांनी सुटकेचा एक सुस्कारा सोडला. कोट्यावधी

रुपये खर्च करून उभारलेल्या या मिशनची जबाबदारी त्यांच्यावर होती.

पालने ती पट्टी हातात घेतली, वाचली, व तो आमच्याकडे वळला आणि मग मला दिसलं की आत्यंतिक प्रयासाने त्याने आपलं मन काबूत ठेवलं आहे. तो ताण त्याच्या चर्येवर स्पष्ट दिसत होता.

'मेजर आर्य, आर यू रेडी ?'

'यस सर. मला सर्व सूचना व्यवस्थित समजल्या आहेत.'

'टेक ऑफ केव्हा आहे ?'

'आतापासून एकेचाळीस मिनिटांनी, सर.'

'ठीक आहे. प्रोसीड टू शेड्यूल, मेजर आर्य. बेस्टलक्.'

'यस सर. थँक यू सर, सर...'

'यस्, पाल ?'

'माझी एक विनंती आहे सर.'

'गो ऑन, मेजर.'

'मी परत येईपर्यंत केबिनमधला टेलिव्हिजन ऑफ केला तर आपली काही हरकत आहे का, सर ?'

'पण का, पाल ?'

'सर, कोणीतरी माझ्यावर नजर ठेवत आहे ही जाणीव आता मला नकोशी वाटते. मी एकटाच राहणं पसंत करीन, प्लीज सर !'

'आय थिंक आय अंडरस्टँड... रिक्वेस्ट ग्रँटेड, मेजर !'

'थँक्यू सर' पालने डॅशवरचं एक बटण हलवलं... ती त्याची शेवटचीच क्रिया आम्ही पाहिली, मग स्क्रीन रिकामा झाला.

यानावर आमची उपकरणे वेधलेली होतीच. एकेचाळीस मिनिटे व बारा सेकंदांनी यान मंगळावरून हललं. सत्तावीस मिनिटांनी ऑटोपायलटने चार्ज घेतला आणि मग त्याचा अथांग अवकाशसागरातला शांत प्रवास सुरू झाला.

पाल आत काय करीत होता हे आम्हाला दिसत नव्हतं; पण हवेत (यानातल्या) होणारा प्राणवायूचा चढउतार, बाष्पाचा चढउतार, तपमानातील फरक... पाल सुखरूप होता, त्याची रोजची कामं करीत होता... फक्त तो दिसत नव्हता.

मंगळाची लाल चकती लहान लहान होत गेली, शेवटी तिची एक लाल ठिणगी झाली. यानामागचे अजस्र पडदे उघडले होते. त्यावर प्रखर सूर्यप्रकाश पडत होता, त्याचं रुपांतर शक्तीत व शेवटी गतीत होत होतं. काळ्या अवकाशातून यान सपाट्याने पुढे सरकत होतं...

बरोबर २५९ दिवसांनी आमच्या दुर्बिणींना यान सापडलं. ठराविक वेळी, ठराविक मार्गावर. ती ठिणगी फुलली, मोठी झाली, काळ्या अवकाशपटावर यानाचं अजस्र सुवर्णपुष्प उमललं...

यानाची गती कमी झाली, थांबली... ते अलगद फिरलं, त्याच्यासाठी बनवण्यात आलेल्या डॉकमध्ये शिरलं... बाहेरचं प्रचंड दुहेरी दार बंद झालं... एअर लॉकमध्ये हवा भरली जाऊ लागली...

आम्ही सर्व (किंवा जवळजवळ सर्व) तिथे जमलो होतो.

कोणी काही बोलत नव्हतं. सर्वांच्या अधीर नजरा यानाच्या हॅचकडे खिळून राहिल्या होत्या. यानाच्या चकाकणाऱ्या त्वचेवर एक काळी केशरेषा दिसत होती... ती किंचित मोठी झाली... आणखी रुंदावली...

हॅच उघडली आणि पाल बाहेर आला.

मेजर दिक्पाल आर्य. मंगळावर पाय ठेवणारा पहिला मानव. इतर अशा काही विलक्षण साहसाहून परतणाऱ्या वीराचं आम्ही उत्कट स्वागत केलं होतं... तसंच आताही पालभोवती कोंडाळं करण्याची आमची इच्छा होती...

पण त्याने एकदाच आम्हा सर्वांकडे पाहिलं आणि ती नजर इतकी विचित्र होती की आम्ही आमचं अंतर राखूनच उभे राहिलो...

बेसचे कमांडर शेवटी पुढे झाले आणि म्हणाले,

'वेलकम बॅक, मेजर आर्य! अँड...'

पण त्याच्यामागोमाग मेडिकल ऑफिसरही पुढे आले होते आणि ते हलक्या, पण सर्वांना ऐकू जाईल अशा आवाजात म्हणाले, 'सर, आधी मेडिकल चेकअप व्हायला हवं... आय ॲम सॉरी...'

'यस्-यस्-कॅरी ऑन, डॉक्टर...'

आणि डॉक्टरनीच शेवटी पालला त्यांच्या लॅबोरेटरीत नेलं...

पालच्या पुनरागमनाचा प्रसंग मी कल्पनेत हजार वेळा आणला

असेल... पण तो असा खास नव्हता! सर्वजण गंभीर, जरा धास्तावलेले...

पालची ती भकास, उपहासात्मक नजर आता आमच्यावर नव्हती, आणि कमांडरसाहेबांची आज्ञाही आता आमच्यावर बंधनकारक नव्हती. पाल टेलिव्हिजन कॅमेऱ्यात दिसताच त्यांनी एक फर्मान सोडलं होतं... मेजर आर्य बेसवर येईपर्यंत या विषयावर कोणीही चर्चा करायची नाही... अपवाद नाही. पण आता पाल परत आला होता आणि आमच्या जिभा सैल सुटल्या होत्या.

'मला एक कळत नाही...' ए. एम्. ओ. म्हणत होता, 'पालजवळ फक्त पंधरा दिवसांपुरतंच अन्नपाणी होतं... एकतीस दिवस तो बाहेर राहू शकलाच कसा ? तो काय खातपीत होता ?'

'त्याला मंगळावर जर काही खाद्य सापडलं असलं तर आपल्याला आपल्या सर्वच कल्पना बदलाव्या लागतील...' एकॉलॉजिस्ट म्हणाला.

'पण त्याची वागणूक!' बेस सायकीॲट्रिस्ट म्हणत होता, 'त्याची नजर ! पाल किती बदलला आहे ! तो आपल्याला ओळखतो तरी का ? यानातला कॅमेरा त्याने का बंद केला ? इतके दिवस तो एकट्या एकट्याने काय करीत होता ?'

'पण आला आहे तो मेजर आर्यच आहे का ?' तीव्र कल्पनाशक्ती असलेला पी. आर. ओ. म्हणत होता... 'असं कशावरून असेल की आपला पाल मंगळावरच्च गतप्राण झाला असेल आणि त्याची जागा घेऊन दुसरं कोणीतरी बेसवर आलं असेल ?'

कोणाच्याही लक्षात येईल की सर्वजण गांगरून गेले होते. मी त्यांच्या संभाषणात भाग घेत नव्हतो. पाल माझा मित्र होता. मंगळावर असं काहीतरी घडलं होतं की पालचा आत्मा त्या ताणाखाली किंवा त्या धक्क्याने पार हादरून गेला होता... तिथे काय झालं ?

अर्ध्या तासात डॉक्टर आमच्यामध्ये येऊन बसले. 'मी तुम्हाला आता काहीच सांगू शकत नाही...' ते आल्या आल्या म्हणाले, 'काही गुप्त ठेवायचं आहे म्हणून नाही... तर मलाच काही माहीत नाही म्हणून. पाल अतिशय थकलेला आहे. आता त्याची तपासणी करणं म्हणजे त्याचे हाल करणंच होतं. मी आता त्याला सिडेटिव्ह दिलं आहे... आणि तो किमान

वीस तास तरी शुद्धीवर येणार नाही... तेव्हा तोपर्यंत सर्वांनी आपली जिज्ञासा कृपया आवरून धरावी...

पृथ्वीवरच्या दिवसरात्रीशी आमचा संबंध नव्हता. आमचं आयुष्य बारा तासाचे दिवस व बारा तासांचे 'झोपेचा काल' अशा कृत्रिम नियमांचं होतं. आता घड्याळात 'संध्याकाळचे' सात वाजत आले होते. तेव्हा पाल उद्या दुपारपर्यंत तरी जागा होणार नव्हता.

संध्याकाळी आठ वाजता सर्वांचं जेवण होत असे. दहा वाजता सर्वांना (जे ड्यूटीवर नसतील त्यांना) आपापल्या केबिनमध्ये जावे लागे. मी केबिनमध्ये गेलो आणि झोपेची एक गोळी घेतली. नाहीतर रात्रभर मनात विचारांनी काहूर माजवलं असतं...

मी शांत झोपेत होतो आणि बाहेर बेसवर सर्वत्र एकत्र हलकल्लोळ माजला होता...

रात्री केव्हातरी पाल बेसवरून नाहीसा झाला होता.

***

तळावरच्या परिस्थितीचं वर्णन करणं कठीण आहे. कारण मी या घटनेकडे परकेपणाने, अलिप्तपणाने, वस्तूनिष्ठतेने पाहूच शकत नव्हतो. पाल माझा सर्वात जवळचा मित्र होता आणि तो आता नाहीसा झाला होता... याचा अर्थ तरी काय ?

तळाचा पृष्ठभाग कित्येक हजार चौरस फुटांचा होता; पण त्याला फालतू, निरुपयोगी असा एक इंचही नव्हता. तेव्हा पाल कोठे लपून बसला असण्याची शक्यतांच नव्हती. (शेवटचा उपाय म्हणून दोन मेकॅनिक स्पेससूट घालून तळाचा बाहेरचा सर्व भाग... अगदी सूर्याकडचा देखील...पाहून आले पण पालचा पत्ता नव्हता.)

तळाच्या आसपास लक्षावधी मैल निर्वात पोकळी पसरली होती.

त्या काळ्या अवकाशात पालने प्रवेश केला होता.

पालने आत्महत्या केली होती.

आता तर भयानक शंकाकुशंकांचं पीकच आलं...

पाल शहाणा होता का त्याला वेडाचा झटका आला ?

आला होता तो पालच होता की त्याच्या अभिरुपात दुसरंच कोणीतरी येऊन तळाची पाहणी करून गेलं ?

किंवा अगदी कडेलोट... पाल परत तरी खरा आला होता का ?

कोणी कोणाला उत्तर द्यायचं ? आणि कसं ?

मला ती चर्चाही असह्य झाली आणि मी एकटाच वरच्या स्टारडोममध्ये जाऊन बसलो. जॅकेटच्या खिशात हात घातला, आणि हाताला एक कागद लागला. मी सहज कागद बाहेर काढला आणि वाचला. वाचता वाचता माझा हात थरथर कापायला लागला, कारण त्या कागदावर देवनागरी लिपीत एकच ओळ लिहिली होती...

श्री, कंपार्टमेंट एस्. ३. एम्. एस्. वन. गुडबाय. पाल.

पालचा संदेश ! मला ! पण कसा ? का तो काल रात्री माझ्या केबिनमध्ये आला होता ? अगदी जायच्या आधी ? आणि मी औषधाच्या तारेत घोरत पडलेलो होतो ! त्याला काही सांगायचं होतं का ? मला उठवायचा त्याने प्रयत्न केला का ? मला कससंच व्हायला लागलं...

मी जागा होत नाही असं पाहून त्याने ही चिठ्ठी घाईघाईनं लिहिली आणि हूकवरच्या जॅकेटच्या खिशात कोंबली...

आणि मग तो त्याच्या वाटेने गेला...

ओ पाल ! पाल ! मला हलवलं का नाहीस ? मला उठवलं का नाहीस ? कदाचित मी तुला परावृत्त करू शकलो असतो ! इतकी घाई कशाची झाली होती तुला ? एखादा दिवस थांबला का नाहीस ? केवढी ही ट्रॅजिडी ! केवढा सत्यानाश !

माझ्या खोलीचं दार ओढून घेऊन तो सावकाश निघाला असेल आणि मग इमर्जन्सी मॅन्युअल एअरलॉक मध्ये गेला असेल... आणि मग बाहेर...

एका सेकंदात अक्षरशः चिंधड्या !

मला ती कल्पना सहनच होईना... देवाची कृपाच म्हणायची की मी डोममध्ये एकटा होतो... कोणालाही माझे अश्रु दिसले नाहीत... कोणाला ही माझे हुंदके ऐकू आले नाहीत... मी आणि परमेश्वर ! (आणि पाल, जवळपास कोठेतरी...) ओ गॉड !



मार्स शिपची पाहणी व्हायचीच होती. त्या टीममध्ये मी असणारच होतो. तोपर्यंत मी कोणतीही हालचाल केली नाही. पालने माझ्यासाठी काय ठेवलं होतं कुणास ठाऊक... पण ते गुप्त रहावं यासाठी जर तो इतकी खटपट करीत होता तर त्याची इच्छा मला मानणंच भाग होतं. आधी मी ते पाहणार होतो, आणि मग (योग्य वाटलं तर...) इतरांना दाखवणार होतो... तेवढी मोकळीक मला खास होती.

पाल तळावर नाही याची खात्री झाल्यावर मग आम्ही मार्स-शिपमध्ये शिरलो. संदेशन सामुग्री तपासण्याची जबाबदारी माझी होती, तेव्हा मी सरळ डॅशबोर्डाकडे गेलो. हालचालीत कोणताही कृत्रिमपणा न आणता इतर कप्प्यांबरोबर तोही कप्पा उघडला. कप्प्याच्या दाराला अडेझिव्ह टेपने कागदाचं एक बंडल लटकवलेलं होतं... पालच्या हस्ताक्षरातले कागद... त्या दृश्याने माझा जवळजवळ विश्वासघात केला... पण मी स्वत:ला सावरलं... कागद खिशात घातले, इतर तपासणी पूर्ण केली, चाचणी घेतली, माझा अहवाल तयार केला, अधिकाऱ्यांना सादर केला.

इतरांच्या बरोबर जेवण घेतलं व मग केबिनमध्ये आलो.

मला वाटतं माझी एकही हालचाल कृत्रिम, संशयास्पद, अशी झाली नाही. कोणालाही कसलीही शंका आली नाही.

एअरमेलच्या अत्यंत पातळ कागदावर बराच काही मजकूर होता. अक्षर पालचंच होतं. कधी वळणदार, कधी वेडंवाकडं...

आणि सर्व काही मलाच उद्देशून लिहिलं होतं...

हे त्याने यानात लिहिलं असलं पाहिजे...

पण म्हणजे... म्हणजे... आधीपासून त्याचा हा निश्चय पक्का झालेला असला पाहिजे...! मी काय केलं आणि काय केलं नाही यावर ते अवलंबून नव्हतं !

तेवढंच एक अल्पसं समाधान !

# हस्तलिखित

आताच टेलिव्हिजन कॅमेरा बंद केला आहे आणि मला जरासा तरी मोकळेपणा मिळाला आहे. टेलिव्हिजनची लेन्स म्हणजे हजारो लोकांचा एक सामुदायिक डोळाच ! तो माझ्यावर खिळला होता तोपर्यंत मला चेहरा सरळ ठेवावा लागत होता, त्याच्याकडे पाहून हसावं लागत होतं, स्वतःच्या हालचालींवर अगदी बारीक लक्ष ठेवावं लागत होतं... आता ते सारं संपलं आहे ! खऱ्या अर्थाने मी अगदी अगदी एकटा आहे ! आणि एकांत मिळाल्याशिवाय काही लिहिणंही शक्य नव्हतं... तेव्हा आता कागद पुढे घेतले आहेत... मला आलेले विस्मयकारक अनुभव जर कागदावर उतरवले नाहीत, पुनरुक्तीने त्यांना जर बाहेर वाट दिली नाही तर ते माझ्या मेंदूच्या ठिकऱ्याठिकऱ्या उडवतील म्हणून हे कथन. कोणाचा विश्वास तर बसणार नाहीच... आणि मी तरी त्यांना दोष कसा देऊ ? माझा स्वतःचा तरी त्यावर

विश्वास आहे का ? असं खरोखरच घडलं अशी माझी खात्री आहे का ? मग लोकांनी मला वेडा म्हटलं, माथेफिरू म्हटलं, भ्रमिष्ट म्हटलं, तर त्यांचा काय दोष ? आणि सर्व काही उतरून ठेवण्याचं हेही एक कारण आहे... मनात सर्व प्रसंग ताजे आहेत तोवरच ते लिहून ठेवायला हवेत. मला अशी भीती वाटते की एकतर मला खरोखर वेड लागेल किंवा जगणं असह्य होऊन मी जिवाचं काहीतरी बरं वाईट करून... आणि मग मानवांना पृथ्वीवरच्या तमाम लोकांना हे भीषण सत्य कळायचं तरी कसं ? मग त्यांना सांगणार तरी कोण...? मग असं वाटतं, त्यांना सांगून तरी काही उपयोग होणार आहे का ? त्यांच्या बिचाऱ्यांच्या हातात काही आहे का ? चांगले सुखात आहेत त्यांना...

हात इतका कापायला लागला की लेखन बरंच करावं लागलं. मला भीती वाटते की असं वारंवार होणार आहे. माझ्या अनुभवाचं वर्णन करणं अतिशय कठीण जाणार आहे; पण काहीहि असो प्रयत्न तर केलाच पाहिजे आणि त्याला उत्तम उपाय म्हणजे सर्व यथानुक्रम, जसं जसं घडत गेलं तसंच लिहीत जायचं... म्हणजे मनाचा असा गोंधळ उडणार नाही, शरीराचा भीतीने थरकाप होणार नाही, हातांना कापरं भरणार नाही...

***

मंगळावर जाण्यासाठी माझी निवड झाली. त्यावेळी मला किती आनंद झाला होता, किती अभिमान वाटत होता, उत्कंठेला कसं उधाण आलं होतं, एकएक क्षण कसा युगासारखा वाटत होता... ते सारं आठवतं, आणि मनात खिन्नता येते. आता ते सगळं संपलं आहे... त्याचं वर्णन करणं म्हणजे मूर्खपणा आहे. त्यावेळी मला जे वाटलं ते योग्य होतं, कारण तेव्हाचं माझं ज्ञान तेवढंच होतं. मनुष्याचे भाव परिस्थितीनुरूप असतात. त्याची ज्ञानाची चौकट रुंदावते, त्याची पार्श्वभूमी बदलते व जे मोठं वाटलं होतं ते लहान दिसायला लागतं; जे रंग आकर्षक व भडक वाटले होते ते मंद व नीरस वाटू लागतात... फरक होत असतो तो बाह्य सृष्टीत नाही...

माणसाच्या नजरेत फरक होत असतो.

माझी नजर आता बदलली आहे, निवळली आहे, अंतर्मुख झाली आहे. तेव्हा मागचे सत्कार समारंभ, अभिनंदनं हे सारं एखाद्या पूर्वजन्मीच्या आठवणींसारखं असतं आणि अविश्वसनीय वाटत आहे... एखाद्या फार पूर्वीच्या पण भडक स्वप्नासारखं... पण स्वप्नातलीही काही काही आपल्याला आवडतात, प्रिय असतात, कायम लक्षात राहतात...

श्री-श्रीहरी मायदेव हा अशांपैकी एक आहे. माझी कल्पनाही नव्हती की मंगळतळावर त्याची अचानक गाठ पडेल... तो दिसला आणि खूप पूर्वीच्या कितीतरी आठवणी उजळून आल्या ! त्याची भेट हीही एक दैवीच गोष्ट असावी... श्री, माझा सर्वांत जवळचा मित्र, पृथ्वीवरच्या आयुष्यातला एकमेव दुवा... महानिर्वाणाच्या आधी नातलगांची, प्रियजनांची भेट घडवून आणतात तसाच तर हा प्रकार नव्हता ना ?

मघाशी लेखन थांबवावं लागलं होतं. जरा पुढचा विचार मनात आला की असंच होतं. मन आवरलं पाहिजे.

***

सर्व सोहळ्यानिशी मला त्यांनी मंगळतळावरून निरोप दिला. मानवाने हे अजस्त्र बूमरँग अवकाशात फेकलं होतं. लक्षावधी मैल दूर असलेल्या मंगळाचा वेध घेऊन ते परत मानवाकडे येणार होतं... त्याला कल्पना तरी आहे का की अवकाशाच्या पोकळीत, विश्वाच्या या अनंत भ्रमणात याच शस्त्रावर एक ताव चढणार आहे, ते एक घातकी, संहारक अस्त्र बनून मानवाच्याच संहारासाठी त्याच्याकडे वेगाने धाव घेत आहे ? त्याला कशी कल्पना असणार ?

आजवर मानवाला कशाची कल्पना आली आहे ? हा: !

पण बाहेर जाताना मीही मानवच होतो... मीही मोठ्या गर्वाने, मोठ्या अभिमानाने, स्वामीत्वाच्या भावनेने आसपासच्या सृष्टीकडे पाहत होतो. आम्ही विश्वविजेते होतो ! पृथ्वी आमची होती, आम्ही चंद्र जिंकला होता, आता मंगळावर निघालो होतो... आमचा फास मंगळावर पडणार

होता, त्या तंतूवरून हजारो... लाखो... कोटी मानव मंगळावर सरकणार होते, मंगळ पादाक्रांत करणार होते... मंगळ मानवमय करणार होते... त्याची दुसरी पृथ्वी करणार होते !

या विजयी सेनेचा मी अग्रदूत होतो !

***

टेलिकन्सोलखाली बटणांची रांग होती. समोरच्या पडद्यावर मला हवं ते दृश्य दिसू शकत होतं. मागच्या बाजूचा कॅमेरा सुरू केला की हजारो मैल खाली, स्वत:भोवती डौलाने फिरणारा पृथ्वीचा निळसर हिरवा अजस्त्र गोल दिसत होता... मनात सहज विचार येऊन गेला, पृथ्वीवरचे कोट्यावधी लोकही माझं हे साहसी प्रयाण पाहत असतील !

डाव्या हाताला तेजगर्भ, डोळे दिपवणारा सूर्य होता... आता मधे संरक्षक वातावरणाचा पडदा नव्हता... अनेक फिल्टर लावूनसुद्धा शक्तीचा तो अजस्त्र झोत डोळ्यांना सहन होत नव्हता.

आणि मग इतर सर्व बाजूंना अनंत अंतरापर्यंत पसरत गेलेलं तारांगण ! कोट्यवधी वर्षांपूर्वी शिलगावलेल्या रंगीबेरंगी ज्योती ! आणखी एका नव्या निर्मितीला आवाहन करणारे, धीर देणारे चिरंतन मित्र ! ऊर भरून यावा असं दृश्य !

मला वाट चुकण्याची काळजी नव्हती. माझ्यापेक्षा सहस्त्र पटीने कार्यक्षम असा गणनयंत्राचा मेंदू अवकाशाच्या सर्व दिशांचा वेध घेत होता. माझ्या यानाचा मार्ग आखून त्याच्या स्मृतीत कोरला होता. त्याच त्या एका मार्गावरून तो माझं यान नेत होता.

माझं प्रवासाचं उद्दिष्ट मंगळ होतं. मंगळही आपल्या कक्षेतून फिरत होता, आता तो अदृश्य होता, दूर कोठेतरी होता; पण नेमलेल्या वेळी, नेमलेल्या ठिकाणी आमची गाठ पडणार होती.

आणि जसजसे दिवस जात चालले तसतसा एक विचार माझ्या मनात प्रकर्षाने, पुन्हा पुन्हा यायला लागला. तेथे मला काय दिसणार होतं? शास्त्रज्ञांचे अहवाल एकच ग्वाही देत होते, 'जशी आपण ओळखतो तशी जीवसृष्टी मंगळावर अस्तित्वात नाही.'

मला वाटायचं या वाक्यातले 'जशी आपण ओळखतो तशी' हे शब्द महत्त्वाचे आहेत, ऑपरेटिव्ह आहेत. या शब्दातच एक सत्य स्वीकृत करण्यात आलं होतं... ते हे, आपल्याला ओळखता येणार नाही अशीही जीवसृष्टी तेथे असू शकेल...

यांत्रिक उपग्रहांनी मंगळावरची छायाचित्रे पाठवली होती. त्यानंतरचे 'सेकंड जनरेशन'चे उपग्रह मंगळावरच्या हवेचे, मातीचे, खडकांचे नमुने घेऊन परत आले होते. शास्त्रज्ञांचा कयास खरा ठरला होता... पण त्या कयासातच शंकेची बीजं होती !

***

यानावरचं आयुष्य इतकं यांत्रिक होतं की जर माझ्यापुढे हे दिव्य, अलौकिक ध्येय नसतं तर मी खासच कंटाळून गेलो असतो. रोजचा व्यायाम, स्पेससूटचे ड्रिल, यंत्रांची चाचणी... तेच, तेच, तेच. दोन अपवाद सोडले तर आसपासच्या देखाव्यातही काहीहि फरक होत नव्हता. पृथ्वी... ती दिवसागणिक दोन लाख मैल दूर जात होती, लहान लहान होत चालली होती; आणि मंगळ... तो तासागणिक दहा दहा हजार मैलांच्या प्रचंड पावलांनी जवळ येत होता, स्पष्ट होत होता, मोठा होत होता... मंगळ ! लाल लाल मंगळ !

तो जवळ आला, मोठा झाला, प्रचंड झाला, अवाढव्य झाला...

सारा प्रकाशच त्याने व्यापून टाकला...

पृथ्वीवर अवकाशयानातून मी कितीतरी वेळा उतरलो आहे. तेव्हा जरा नवेपणा सोडला तर हा अनुभव माझ्या सरावाचा होता.

विरळ वातावरणाशी पहिला संबंध... एक चाटता स्पर्श...

पुन्हा अवकाशात एक झेप... रेट्रोरॉकेटसचा धक्का...

जी मीटरचा वाढत जाणारा दर्शक... दोन, तीन, चार, पाच...

शरीराच्या नसांनसांवरचं असह्य ओझं...

कानात एखाद्या पडघमसारखी घुमणारी नाडी...

आणि मग भूमीला स्पर्श... सर्व शांतता...

डोक्यात चढलेलं रक्त खाली उतरतं. आवळलेले दात मोकळे होतात.

नाडी हळुहळू स्थिरावते. हात हालवता येतात.

मी मंगळावर आहे. शरीर, मेंदू, यान, सर्व काही सुरक्षित. परफेक्ट लँडींग !

***

मी मंगळावर पोहचलो होतो ! कृती पूर्ण झाल्यावर मग त्यातला असामान्यपणा मला जाणवत होता ! मंगळ ! दुसरा ग्रह ! बाहेर काय आहे ते पाहण्यासाठी मी अधीर झालो होतो... पण अवघडलेले पाय लवकर हलेनातच. त्यांना जरा मसाज करावा लागला आणि मगच त्यांच्यात जरा संवेदना आली तरीही पहिली पावलं लंगडतच होती.

तीन इंची क्वॉर्टझच्या पोर्टहोलमधून मी बाहेर नजर टाकली. काळपट लालसर रंगाची रेताड जमीन. तिरक्या उन्हाच्या स्पष्ट छाया. मग थर्मामीटरकडे लक्ष गेलं. बाहेरचं तपमान उणे सहा होतं. याची आम्हाला अपेक्षा होतीच. सूर्यापासून अंतर जास्त, वरचं वातावरण पृथ्वीपेक्षा विरळ- उष्णता येणार तरी कोठून ?

आणि आता बाहेर जायची वेळ आली होती. मंगळावर वापरण्यासाठी त्यांनी एक खास स्पेससूट बनवला होता. बाहेरची हवा विषारी नव्हती, फक्त त्यात प्राणवायूचं प्रमाण कमी होतं; तेव्हा मला बरोबर फक्त ऑक्सिजनच तेवढा न्यायचा होता. बाहेर निर्वात पोकळी नव्हती, तेव्हा शरीराचं, थंडीपासून संरक्षण एवढंच एक काम राहिलं होतं. सर्वत्र भरपूर सामान नेऊ शकत होतो. त्यात कॅमेरा, दुर्बिण, रिव्हॉल्व्हर, वॉकीटॉकी, टॉर्च, दोरी, एक घडीची शिडी, चाकू असं (व बरंच इतर) नेहमी ( व अपघातात) उपयोगी पडणारं सामान होतं आणि शिवाय ३६० तास पुरेल इतकं अन्नपाणी. अवघड वाटतं ? तसं नाही... पाणी बर्फाच्या रुपात होतं, अन्न कॉन्सेंट्रेटेड टॅब्लेटच्या रुपात होतं.

सर्व काही व्यवस्थित आहे का नाही हे पाहून व मनातल्या मनात देवाची प्रार्थना करीत मी एक लॉक उघडलं...

नजरेला समोर दृष्टीस पडलं ते चमत्कारिक, हिरवट रंगाचं आकाश आणि त्यात भरदिवसा चमचमणारे तारे... लांबवर एक मध्यम आकाराच्या टेकड्यांची ओळ दिसत होती... बाकी काही नाही. ओसाड लालसर मैदानावरून थंडगार वारा वाहत होता... धुळीचे लहान लहान स्तंभ उभे करीत होता... मला वाटतं माझ्या शेवटच्या संदेशात मी ही एकटेपणाची भावना शक्य तितकी स्पष्ट करून सांगितली...

चार हजार मैल व्यासाच्या प्रचंड ग्रहावर मी एकटा होतो. विद्युत प्रवाहावरून जाणारा आवाजाचा एकच एक धागा मला इतर मानवांना जोडत होता... एक क्षीण, क्षीण बंध ! किती नाजूक !

यानाच्या भिंतीला कड्या होत्या, त्यांच्या सहाय्याने मी खाली उतरलो आणि प्रत्यक्ष मंगळ भूमीवर उभा राहिलो. मंगळावरच्या हवेचे पहिले कण नाकावाटे शरीरात गेले... शरीरावर काटा आला... आणि केवळ ती हवा थंड होती म्हणून नाही... ती परकी होती !

मी करणार असलेली प्रत्येक कृती पाहिली होती, **'फर्स्ट एव्हर'** होती... पहिला श्वास, पहिलं पाऊल, पहिला आवाज...

***

मंगळावरचं वर्ष आपल्या दोन वर्षांएवढं असलं तर तिथला दिवस मात्र आपल्या २४ तासांएवढाच होता. एक सूर्याभोवतीच्या भ्रमणकाळावर अवलंबून होतं, दुसरं स्वत:भोवती फिरणाऱ्या काळावर अवलंबून होतं. मी असं ठरवलं होतं की चार तास यानापासून दूर चालत जायचं, तो भाग पहायचा, निरीक्षणं करायची आणि रात्रीच्या मुक्कामाला परत यानात यायचं, रात्रीची थंडी असह्य जरी नाही तरी त्रासदायक खास वाटली असती. पहिले काही दिवस असं वेगवेगळ्या दिशांना चाचणीखातर जाऊन यायचं आणि मग जो भाग जास्त आशादायक वाटेल त्या दिशेला एक मोठी सफर करावयाची. मी ज्या अनेक गोष्टी ठरवल्या होत्या त्यापैकी ही एक होती.

सिद्धीस कोणत्याच गेल्या नाहीत.

झालं हे चांगलं झालं का वाईट झालं ?

मी तर या प्रश्नाचं उत्तर देऊ शकत नाही.



मी मंगळावर उतरलो तेव्हा सूर्य नुकताच वर आला होता. सारा दिवस माझ्यापुढे होता. टेकड्यांची दिशा पसंत केली याचं कारण एकच... आसमंतात लक्ष वेधून घेणारी ती एकच गोष्ट होती. बाकी सर्व दिशांना ओसाड, रेताड, सपाट, लालसर, निर्जीव माळरान पसरत गेलं होतं. अगदी दृष्टीच्या मर्यादेपर्यंत. हिरवट आकाशाला टेकेपर्यंत.

अंतरही फसवी होती. येथलं क्षितीज लहान होतं. ज्या टेकड्या मला बऱ्याच लांब अंतरावर असाव्यात असं वाटलं होतं त्या पाहता पाहता जवळ आल्या. सूर्य वर यायच्या आधीच मी टेकड्यांच्या पायथ्याशी पोहचलो होतो. चालण्याने आणि सूर्य डोक्यावर आला होता म्हणून आता थंडी कमी जाणवत होती. सूर्याच्या स्थितीवरून मी एक अंदाज केला... मी विषुववृत्ताच्या जवळच, उत्तरेस होतो.

टेकडी चढणं फार सोपं होतं... पुन्हा एकदा कमी वजनच माझ्या मदतीला आलं होतं. अर्थात् प्राणवायू माझ्या मदतीला होताच. केवळ मंगळावरच्या हवेत मला दहा पावलांवर दम लागला असता.

पहिली टेकडी सुमारे हजार फूट उंच होती. तिच्या माथ्यावरून मी मागे वळून पाहिलं. अथांग सागरासारख्या पसरलेल्या माळरानात मार्सशिप वनची चकचकती, उभी सुई किती विसंगत दिसत होती ! या निर्जन वाळवंटात ती एकदम काहीतरी परकं, नवीन, घेऊन आली होती... आणि हे विचार माझ्या मनात चालले असतानाच मला पहिला धक्का बसला. इथे हे स्पष्ट करायला हवं की माझी बुद्धी पूर्ण शाबूत होती. मेंदूला हलकेपणा, बधीरपणा वगैरे काहीहि आला नव्हता. माझे विचार सुसंगत, तर्कशुद्ध, स्पष्ट असे होते. मी नॉर्मल होतो.

मैदानावर तिरकस पडणारा उन्हाचा कोन बदलला किंवा काहीतरी बदल झाला खास. सर्व मैदानावर एक अतिसूक्ष्म असा बदलाचा वारा वहात गेल्यासारखा वाटला. ज्या जागेवर मला इतका वेळ एक ओसाड मैदान दिसत होतं त्याच जागी एक अत्यंत अस्पष्ट, थरथरणारा, हेलावणारा असा दुसराच देखावा दिसत होता. जणु काही एखाद्या अत्यंत पातळ, पारदर्शक पडद्यावर फिकट रंगात एक चित्र काढलं होतं. माळरान तर समोर

होतंच... पण त्यावर एखाद्या पटलासारखं दुसरं काहीतरी दिसत होतं... एक नगर !

हे भयंकर, उत्पाती शब्द आता उतरले आहेत. त्याक्षणी माझ्या मनात विचारांचा जो काही विलक्षण प्रक्षोभ झाला तो मी आता जरा मोकळेपणाने मांडू शकेन. ते एक नगर होतं. माझी चूक होणं शक्यच नव्हतं. उंच उंच इमारती, त्यांना लगट करणाऱ्या पसरट पण प्रचंड हवेल्या, मधूनमधून चमत्कारिक रंगाची झाडं, त्या सर्वांतून जाणारे आखीव रस्ते, त्यावरून हलणारी वाहनं...

सर्वच्या सर्व देखावा क्षणभंगूर वाटत होता. सारखा हलत होता. नजरेच्या अगदी मर्यादेजवळचं काहीतरी मोठ्या प्रयासाने ध्यानात आणावं, क्षणभरही दुर्लक्ष झालं तर ते अदृश्य होण्याची भीती वाटावी, तसंच माझं झालं होतं. मी हलत तर नव्हतोच, डोळ्याची पापणीसुद्धा हलली नव्हती. नजरेच्या काठावर हेलावत राहणाऱ्या, विलक्षण दृश्याकडे मी डोळ्याची पापणी न लववता पाहत उभा होतो.

मनातल्या विचारांचा तर्कशुद्धपणा एका क्षणात गेला. समोरच्या त्या दोलायमान देखाव्याला तर्काची कोणती कसोटी लावणार ? मनात एक स्फोट झाला... चाकाच्या आऱ्यांसारखे विचार एकाच वेळी दशदिशांना, भिरभिरत चालले...

हा मला भास होत आहे का ? येथल्या विचित्र परिस्थितीचा माझ्या मेंदूवर काही अनिष्ट परिणाम झाला आहे का ? पण मी या घटनेचे विश्लेषण करीत होतो, करू शकत होतो, ही एकच गोष्ट सहज सिद्ध करीत होतो की हे माझ्या बाहेरचं काहीतरी आहे, याचा उगम माझ्या मनात, कल्पनेत किंवा भ्रमात झालेला नाही...

दुसरा विचार होता... ही मंगळावरची संस्कृती आहे का ? नवल नाही माझ्या मनातून उडत्या तबकड्यांची मागच्या पिढीतली रसाळ वर्णनं एकामागोमाग एक अशी गेली...

तिसरा विचार हा आला... मी आताच माळरानावरून चालत आलो. तिथे जर खरोखर एखादं शहर असलं, तर त्यातून चालत आलो. माझ्या यानाच्या ज्वाळा, आवाज, उष्णता... या सर्वांचा त्यांच्यावर काहीच

परिणाम झाला नाही ? मला स्वत:ला प्रत्यक्ष त्यांच्यातून जाताना काहीच जाणवलं नाही ? ही अस्तित्वाची दुसरी एखादी पातळी आता मला जाणवत होती काय ?

आणि मग शेवटचा विचार... तेथे काही दिसलं नाही, जाणवलं नाही... मग आता मला कसं काय दिसू लागलं ? हा अंतराचा, उन्हाचा, नजरेचा काही विशेष परिणाम आहे का ?

आणि या विचित्र नगरातले रहिवासी तरी कसे आहेत ? हा विचार मनात येताच मात्र शरीर खरोखरच एकदम शहारून उठलं ! मानवाचा आजवर स्वत:खेरीज इतर कोणत्याही परक्या बुद्धीजीवी अस्तित्वाशी संपर्क आलेला नाही. संबंधाचा अनुभवच नाही... तेव्हा कोणतेही तर्क, अंदाज, कल्पना हे उपयोगी पडणार नाही...

होतो तेथून मला अत्यंत अस्पष्ट अशा मोठाल्या हालचाली तेवढ्या दिसत होत्या. सागर जसा दूरवर निळा दिसावा, पण तो मोहक निळा रंग वाटेतच कोठेतरी हरपून जावा आणि किनाऱ्यालगतचं पाणी साधं, काचेसारखं, रंगहीन दिसावं असंच काहीसं होत होतं. नजर अलिकडे आणली की सर्व काही अदृश्य होत होतं, खालचं उजाड माळरान तेवढंच दिसत होतं...

हे जे कोणी असतील त्यांच्याशी संपर्क तर साधायलाच हवा होता. माझ्या आगमनाचा सर्वात मुख्य (पण अलिखित व अनुच्चारित) हेतू तोच एकमेव होता. आल्या आल्या मला संधी मिळाली होती. तिचा फायदा उठवणं माझ्या कौशल्यावर अवलंबून होतं.

प्रयोगादाखल मी टेकडी उतरून त्या तरंगणाऱ्या, विरळ नगराकडे यायला लागलो; पण शंभरएक पावलं टाकली आणि मला माझ्या प्रयत्नातला फोलपणा कळून चुकला. मी एवढासा जवळ येताच माझ्या बाजूच्या रेषा पुसट व्हायला लागल्या होत्या, हवेत विरघळून जायला लागल्या होत्या. मी प्रत्यक्ष तेथे पोहचेपर्यंत हे सर्व अजब नगर धुक्यासारखे हवेत विरघळून जाईल, अदृश्य होईल यात मला शंका राहिली नव्हती. नाही, जवळ जाण्याने काहीच फायदा होणार नव्हता. उलट दिसत होतं तेही नजरेआड होणार होतं...

मी परत टेकडीवर चढलो आणि समोर पाहत राहिलो.

***

समोरच्या माळरानाचा (!) भाग तेवढा सोडला तर माझ्या चारी बाजूंना उंच उंच टेकड्या होत्या. त्यावर झाडं, झुडपं, गवत, काहीहि नव्हतं; पण आता माझा माझ्या डोळ्यांवर विश्वास राहिला नव्हता. येथे जर खरोखरीच काही असलं, तर ते मला इथे उभं राहून दिसणार नाही... खूप लांब गेलो तरच कदाचित दिसेल !

कोणी सांगावं, येथे मंगळावरच्या एखाद्या रहिवाशाचा छानदार बंगला असेल. आवतीभोवती बाग असेल, तो (किंवा ती, किंवा ते !) माझ्या आसपास वावरतही असेल... क्षणभर खरोखरच मी थरथरणारं शरीर चोरून घेतलं... पण मला त्याची कोणतीही पुसटशीसुद्धा जाणीव होणार नाही !

आणि त्यालाही माझी जाणीव होणार नाही ! मी मनाशी समाधानाने विचार केला... ज्या अर्थी त्यांच्या गजबजलेल्या शहराच्या मध्यवस्तीत माझं थगथगतं यान उतरूनसुद्धा ते अगदी निर्विकार आहेत, त्याअर्थी त्यांना काही जाणवलेलंच नाही !

पण हे समाधान फार वेळ टिकलं नाही. मी त्यांना दिसलो नाही, जाणवलो नाही, तरी त्यांचं काही बिघडत नव्हतं. ते आपलं आयुष्य सुखा समाधानाने जगत राहणार होते... पण मी ! त्यांच्याशी संबंध जोडणे हे माझे एकमेव कर्तव्य होतं... मला ते करायलाच हवं होतं, मला त्यात अपयश आलं तर सर्व मानवजातीला चालून आलेली एक अमूल्य संधी मी दवडणार होतो ! सर्व मानवजातीचंच नुकसान होणार होतं ! मी असं समाधानात दूर राहून चालणार नव्हतं... ते राहोत बेफिकीर राहिले तर... मला काळजी करणं भाग होतं !

***

टेकड्यांच्या मागे काय आहे याचा विचार आता मनात सुरू झाला. वास्तविक मी आता यानाकडे परतायला हवं होतं, मला आलेला अनुभव

मंगळावरच्या अधिकाऱ्यांना सांगायला हवा होता... पण खरं सांगायचं म्हणजे त्या नगरातून जायचं म्हणजे मला जरा अवघडच वाटत होतं. भीतीच अगदी नाही... पण अनिच्छा खास. अर्थात तेथून जाणं हे जर अपरिहार्य असतं तर मी ते खासच केलं असतं... पण मी पाहणी करण्यासाठी बाहेर पडलो होतो... तेव्हा आणखी पुढे जाऊन पुढच्या प्रदेशाची पाहणी केली असती तर तो माझ्या कार्यातलाच एक भाग ठरला असता.

कसंही असो, मी मनाचं समाधान केलं आणि टेकड्यांच्या रांगेकडे आगेकूच केली. टेकड्या सर्वसाधारणपणे एकाच उंचीच्या होत्या. एकमेकांना छेदणाऱ्या तीनचार ओळी एकत्र आल्या होत्या एवढंच काय ते. लहान मोठे उंचवटे ओलांडल्यानंतर सुमारे तासाभरात मी टेकड्यांच्या दुसऱ्या कडेवर आलो. इकडे काही वेगळं दिसेल ही आशाच मी करायला नको होती... म्हणजे मग ते ओसाड, वैराण माळरान पाहून इतकी निराशा झाली नसती.

निराशेचा चटका जास्त तीव्र होत होता, ती धार जास्त बोचक होत होती ती त्यामुळे... की मला माहीत होतं की हे माळरान खरोखर ओसाड नाही, खरोखर निर्जन नाही. त्यावर गावं असतील, शहरं असतील, बागा, शेतं, उद्यानं, हमरस्ते, कारखाने, क्रीडांगणं असतील... मला मघाशी एका नागरी संस्कृतीचं जे एक ओझरतं दर्शन झालं होतं त्यावरून या गोष्टी आपोआपच येत होत्या... तर मग हे सारं असेल... पण मला ते दिसत नव्हतं ! कधी कोणी माणूस अशा दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडला असेल का?

काहीतरी पाहण्यासाठी मी लक्षावधी मैलांवरून आलो होतो, जे हवं आहे ते इथे आहे याची मला साक्षही पटली होती... पण माझ्यातच अशी काहीतरी उणीव होती की जिच्यामुळे मला ती गोष्ट मिळवता येत नव्हती ! हा शाप मला एकट्यालाच होता की साऱ्या मानवानांच होता ! सर्व मानवजातच या मंगळावरच्या लोकांच्या सहवासापासून वंचित राहणार होती का ! नाही, मला अपयश घेऊन चालणारच नव्हतं... मला यशस्वी व्हायलाच हवं होतं.

दूरवरच्या क्षितीजरेषेकडे पाहता पाहता मला माझ्याजवळच्या मोठ्या दुर्बिणीची आठवण झाली... माझ्या मूर्खपणाबद्दल मी स्वत:ला अक्षरश: लाखो शिव्या मोजल्या. मघाशी मला दुर्बिणीचा उपयोग करण्याची

आठवण का झाली नाही ? समोर तरळणाऱ्या अर्धदेखाव्याकडे मी नुसता शुंभासारखा पाहत उभा राहिलो होतो... तेव्हा ही अक्कल कशी सुचली नाही ? स्वत:वरच्या रागाला कारण होतं... हा सारा प्रकारच इतका अनोखा, बेभरवशाचा वाटत होता की टेकड्यांची ओळ परत एकदा तुडवीत मी पलिकडच्या टोकाला पोहचेपर्यंत माळरानावरचं ते नगर तिथे असेलच याची मला शाश्वती वाटत नव्हती... आणि आता दिसलं नाही तर ?

स्वत:शी चडफडत मी परत माघारी फिरलो. वाटेत ठेचा लागत होत्या (पायातून शिणका आणणारे दगड मात्र खरे होते !) टेकड्यांची शेवटची ओळ आली. समोर हिरवट... काळसर आकाश आलं आणि माझी नजर जरा धास्तीनेच खालच्या उतारावरून मैदानावर गेली.

पण मला भ्यायचं काहीच कारण नव्हतं. खालच्या देखाव्यात काहीहि फरक झालेला नव्हता तेच ते दूरवर, अस्पष्ट दिसणारे नगर आपला अविश्वसनीय आकार अवकाशावर उठवीत उभं होतं...

घाईने मी डोळ्यांना दुर्बिण लावली... आणि मग मला समजलं की एवढी घाई करून परत आलो नसतो तरी चाललं असतं. कारण माझी पाच मैलांच्या रेंजची दुर्बिणही त्या देखाव्यात कोणताही स्पष्टपणा, रेखीवपणा आणू शकत नव्हती. ते नजर अर्धरेखित राहिलं.

दुर्बिण खाली करून मी आश्चर्याने समोर पाहत राहिलो. ज्या वैश्विक नियमांवर माझं शास्त्र आधारलेलं होतं त्यांचाच हा भंग होता. समोर जे काही असेल ते मला वर्धित, स्पष्ट स्वरुपात दुर्बिणीतून दिसायला हवं होतं; पण ते आता होत नव्हतं.

माझा विचार परत एकदा, जरा वेगळ्या रुपात, मनात आला

जर समोर काही असेल तर ते मला दिसायला हवं !

जर...! मनात विचारांची गर्दी उसळली. एक शंका राहूनराहून मला डिवचत होती, तीही आता दूर झाली. आमच्या उपग्रहाना मी मंगळनगरी का दिसली नव्हती ? तिचं चित्र उपग्रहांच्या प्रखर अशा कॅमेऱ्यांनी पृथ्वीवर का पाठवलं नव्हतं ? ज्या कारणासाठी आता मला ते दुर्बिणीतून दिसत नव्हतं त्याच कारणासाठी ! यांत्रिक पद्धतीने त्याचं रेखन, वर्धन, प्रक्षेपण होत नव्हतं... यातून एकच अर्थ निघत होता. त्यांचं अस्तित्व

द्रव्यावर... निदान आमच्या सिद्धांतातील द्रव्यावर... आधारलेलं नव्हतं; ते एका वेगळ्याच पातळीतलं अस्तित्वं होतं !

ज्या पातळीवर भास, भ्रम, स्वप्ने, स्मृतीचित्रे असतात त्या !

आतापर्यंत कशानेही बसला नव्हता इतका मोठा धक्का मला या निष्कर्षाने बसला. मंगळावरच्या त्या ओसाड टेकडीवर मी उभा होतो, आणि एका अपरिचित भीतीने शरीर शहारून उठत होतं...

***

मी आता काय करायला हवं होतं ? 'मला समोर एक अद्‌भूत नगर दिसत आहे; पण त्याचा फोटो काढता येत नाही, त्यातले आकार स्पष्ट दिसत नाहीत, ते लांबूनच पाहावं लागतं, जवळ गेलं की अदृश्य होतं...' असा संदेश मी वर पाठवला तर त्याची काय प्रतिक्रिया होईल ? त्यांचा विश्वास तरी बसेल का ? मला ज्याची भीती वाटत आहे नेमकी तीच शंका त्यांना येणार नाही का ? ते तसं स्पष्ट बोलणार नाहीत; पण त्यांचा खात्रीने असा ग्रह होईल की एका अवघड कार्याच्या ताणाखाली माझं मन व मेंदू विकृत झाला आहे, तो बरोबर काम देत नाही... मी कितीही तळमळून सांगितलं तरी त्यांचा विश्वास बसणार नाही... प्रत्येक वेडा त्याच्या विकृत विश्वाचा असाच अट्टाहास धरतो, ते मनात म्हणतील ! (आणि लगोलग मला परत यायची आज्ञा देतील... आणि परत जाणं तर शक्यच नाही; इथे फार फार महत्त्वाचं असं एक रहस्य दडलेलं आहे; त्याचा तपास केलाच पाहिजे; आणि तोपर्यंत त्यांच्या समोर जायलाच नको ! आज्ञाभंगाचा आरोप निष्कारण ओढवून कशाला घ्यायचा ? नाहीतरी मला तीनशेसाठ तास बाहेर राहण्याची मोकळीक आहेच... मी लवकर परत आलो नाही तरी त्यांना कोणतीही धास्ती वाटणार नाही, कोणतीही शंका येणार नाही...)

खरं सांगायचं म्हणजे खालच्या मैदानात जायची माझी इच्छा नव्हती; आता तेथे काहीतरी असल्याची जाणीव झाली होती आणि त्यातून यानाकडे जायचं जिवावर आलं होतं. मनात येऊन गेलेली सर्व कारणं अर्धवटच खरी होती; पण त्यांच्याखाली मनात खोलवर एक भीती दडलेली होती... अपरिचिताची नेहमी वाटणारी भीती...

सूर्य माथ्यावरून ढळला होता, पश्चिमेकडचा मार्ग क्रमत होता. काही वेळातच सूर्य क्षितीजाखाली जाईल, अंधाराचं राज्य येईल आणि मग काय ? मनात हाही विचार डोकावायला लागला होता.

मी घड्याळात पाहिले. यानाबाहेर पडल्याला मला पाच तास झाले होते. जेवण करायची वेळ झाली होती. आणखी एक 'प्रथम' गोष्ट घडणार होती. मंगळभूमीवर मानवाचं पहिलं भोजन !

सूर्य अस्ताला गेला. संधीप्रकाश फारच थोडा वेळ टिकला, आणि जो होता तोही अगदी क्षीण होता. कारण विरळ वातावरणात प्रकाश स्कॅटर करण्याची शक्तीच नव्हती. सूर्याची कड नाहीशी झाली आणि पाहता पाहता गडद अंधार पसरायला लागला. तारे तर दिवसाही दिसत होते, ते आता जास्त प्रकाशमान दिसू लागले. अंधार सुरुवातीस वाटला होता तेवढा गडद राहिला नाही. एक जराशी रुपेरी रंगाची सर्वत्र पखरण होत राहिली.

पण माझं सर्व लक्ष समोरच्या नगरावर होतं. दिवस गेला की तेही अदृश्य होणार होतं का ? वाळवंटात दिसणाऱ्या मृगजळासारखाच हा एखादा प्रकार होता का ? एक निव्वळ फसवणूक ?

एका चपट्याशा कपारीला मी टेकून बसलो होतो ? समोरच्या अस्पष्ट होत जाणाऱ्या नगर-रेषांवर नजर खिळली होती. आता तर आणखीच डोळे ताणून पहावं लागत होतं... या ताणानेच मला वाटलं की त्या अस्पष्ट रेषात काही काही प्रकाशबिंदू दिसत आहेत...

पण एका सेकंदातच मी ताड्दिशी उभा राहिलो. कारण ते प्रकाश भासात्मक नव्हते. ते सर्व नगरच रंगीबेरंगी प्रकाश रेषांनी उजळून निघालं होतं ! झगमगणाऱ्या, बदलणाऱ्या, एकमेकात मिसळणाऱ्या किंवा विभक्त होणाऱ्या अनंतरंगी प्रकाशरेषा...

हा देखावा अजूनही अस्पष्ट होता. तरी विलक्षण मोहक होता. मनावर एक आकर्षणाचा पाश पडला होता, तो मनाला, शरीराला तिकडे खेचत होता... खूप दिवसांची सवय म्हणून नकळत माझे हात दुर्बिणीकडे गेले आणि दुर्बिण डोळ्यासमोर आली.

दुर्बिण माझ्या हातून जवळजवळ खालीच पडली... कारण त्यातून माझ्या डोळ्यासमोर, अगदी जवळ, अगदी स्पष्ट असा एक आकार उभा

राहिला होता. मी झटकन् दुर्बिण खाली घेतली... समोर काही नव्हतं. तेव्हा लांबवरचं काहीतरी मला आता दुर्बिणीतून दिसलं होतं... ती परत डोळ्याला लावावी का नाही याचा मी जरासा विचार केला... कारण आताच त्यातून दिसलेल्या आकाराची आठवण अजून मनात होती. तो आकार इतका विलक्षण, इतका अकल्पित, इतका धक्कादायक होता की त्याच्यावर विचारच ठरत नव्हता... पण अर्थात शेवटी मी दुर्बिण वर केलीच... चांगलं मिनिटभर त्यातून पाहिलं आणि मग थरथरत्या हाताने ती खाली घेतली व इतका वेळ रोखलेला श्वास सोडला...

दुर्बिणीतून मला जे काही दिसलं होतं त्याचा काही अर्थच लागत नव्हता. वेगवेगळे आकार एकदम दृष्टीक्षेपात येत होते, काही न समजणाऱ्या क्रिया करीत होते. लगलीच नाहीसे होत होते... त्या आकारांचं जमेल तेवढे वर्णन मी करणारच आहे, पण त्याआधी मनात उभा राहिलेला एक प्रश्न मला सतावत होता... दिवसा जर मला माझी दुर्बिण काहीहि दाखवू शकली नाही, तर मग रात्रीच्या वेळीच ती व्यवस्थित काम कसं करू लागली?

हा केवळ तांत्रिक काथ्याकूट नव्हता. मी एका अनोख्या जगावर आलो होतो. पूर्वीचे अनुभव येथे उपयोगी पडणार नव्हते. एव्हानाच मला समजलं होतं... मला ज्ञात असलेले शास्त्राचे नियम इथे पाळले जात नव्हते. तेव्हा मग हा गुणदर्शक बदल का झाला ? मी येथे एकटा आहे ही जाणीव मला क्षणभरही सोडून चालणार नव्हतं. माझं सर्वात मोठं हत्यार म्हणजे माझा मेंदू... मानव जातीचं ज्ञान, अनुभव बरोबर घेऊन आलेला, प्रत्येक अनुभव तर्काच्या कसोटीवर पारखून घेणारा माझा प्रगल्भ मेंदू. घटनातला कार्यकारण भाव समजल्याशिवाय घाईने कोणतीही कृती करणं केवळ मूर्खपणाचंच नाही तर प्रसंगी आत्मघातकीपणाचं ठरलं असतं. काहीतरी झालं होतं... ते का झालं होतं याचा विचार आवश्यक होता. माझं विचारचक्र परत मूळपदावर आलं... समोर असा कोणता बदल झाला होता ?

घटनेचा कार्यकारणभाव तिच्या अभ्यासावरूनच समजून घ्यायचा असतो. तेव्हा मी परत दुर्बिण डोळ्यांना लावली आणि समोर पाहू लागलो. परत एकदा ते विचित्र आकार केवळ एका हातावर आले; पण आता माझा हात मघापेक्षा जास्त स्थिर होता.

आणि आता ते आकार. इतक्या दूर अंतरावरून त्यांचं खरं मोजमाप शक्य नव्हतं, पण माझी अशी कल्पना झाली की त्यांची उंची सात-आठ फुटांची असावी. त्यांना सर्वात जवळची उपमा म्हणजे लाल टोळांचीच शोभली असती... दोन पायावर चालणारे टोळ. शरीराचे तीन गोलाकार भाग दिसत होते. त्यावर रंगीबेरंगी पट्टे होते... मग तो त्वचेचाच रंग होता की वरून काही पेहेराव केला होता हे कळणं कठीण होतं. दिसत होतं ते वरचं खूप मोठं मस्तक, त्यात बरेच मोठे, अनेक पैलू असलेले डोळे, त्याखाली एक लंबवर्तुळाकार भाग होता. त्याच्या दोन्ही अंगाला प्रत्येकी दोन सांधे असलेले दोन दोन हातांसारखे अवयव होते. त्याखाली तिसरा गोलाकार भाग होता व त्यातून दोन पाय खाली जमिनीवर टेकत होते. हे ध्यानात घेतलं पाहिजे की डोकं, हात, पाय इत्यादी मानवसदृश्य उल्लेख मी करीत आहे ते केवळ वर्णनास सोपं जावं म्हणूनच. खरं पाहिलं तर त्यांच्यात इतका विचित्रपणा होता की शब्द त्याचं वर्णन करूच शकत नाहीत.

त्यांच्यातला यांचा एक पण बराच मोठा गट होता. त्यांच्याशिवाय इतरही आकार दिसत होते; पण ते तर यांच्याहूनही विचित्र आणि खऱ्या अर्थाने भयानक होते. कारण जो पहिला प्रकार मी वर्णन केला त्यांना जीवशास्त्राचा, उत्पत्तीशास्त्राचा काहीतरी आधार होता. त्यांचा प्रत्येक अवयव कोणत्या ना कोणत्या ठराविक हेतूसाठी वापरला जात असावा अशी निदान कल्पना तरी करता येत होती. माझ्या अनुभवाच्या मर्यादा थोड्या मागेपुढे करून मी त्यांना त्या चौकटीत बसवू शकत होतो.

पण हे दुसरे आकार! त्यांच्या बाह्यरेषा समर्थनीय नव्हत्या, असह्य होत्या, एवढंच नाही, त्या बदलत होत्या, यांच्या निर्मितीमागची उपपत्तीच लागत नव्हती, त्यांना तर्कशुद्ध व्युत्पत्तीच नव्हती... कधी ते खूप मोठे होते, कधी लहान होते... कधी पहिला प्रकार दुसऱ्यांचा पाठलाग करीत

होता, कधी उलट होत होतं... आणि यातले अनेक एकदम नाहीसे होत होते, त्यांच्या आसपास नवीन आकार जन्म घेत होते... असा हा विचित्र कार्यक्रम डोळ्यांसमोर चालला होता.

त्यांच्या अस्तित्वामागची, हालचालीमागची प्रेरणाच अमानवी होती, मग त्यांचे हेतू किंवा उद्देश किंवा प्रयत्न हे मला कसे समजणार ? त्यांच्या कृतींचा अर्थ तरी कसा लागणार ? मनातले संकेत काही एक मर्यादेपर्यंतच उपयोगी पडत होते... त्यापुढे सर्व काही अर्थहीन होतं.

***

मागच्या बाजूने मंगळाचा एक चंद्र आकाशात उगवला होता. तो डीमॉस होता की फोबस होता हे मला माहीत नाही. तिथींचा नियम लावायचा म्हटला तर त्याची अष्टमी असावी. त्याचे क्षीण किरण इतर ताऱ्यांच्या प्रकाशात फारशी भर घालू शकत नव्हते; उलट देखाव्यात एक नवा उदासपणा मात्र आला होता. चंद्र ही रातस्वप्नांची, अस्वस्थ मनस्थितीची, उसळत्या विकृतींची खूण आहे...

मी काय करायला हवं होतं ? रात्र गार होत चालली होती. टेकडीवर गारठा जास्त जाणवत होता. येथे लांबवर, कुडकुडत उभा राहून मी काय मिळवणार होतो ? दुर्बिण जर काही गोष्टी मला दाखवू शकली तर मला (जवळ गेलो तर...) प्रत्यक्ष डोळ्यांनीही ते दिसेल. तेव्हा खाली जाणं हा एकच पर्याय माझ्यापुढे होता.

पुढचं सारंच इतकं अनिश्चित होतं की पावलं अडखळली तर त्यात काही नवल नव्हतं. सर्वथैव नव्या अशा एका घटनेकडे मी चाललो होतो. एक निष्कर्ष मघाशीच निघाला होता... ज्या अर्थी हे आकार माझ्या दुर्बिणीतून दिसतात, त्या अर्थी ते खरे आहेत, माझ्याच पातळीवरच आहेत. ते शत्रू असतील किंवा मित्र असतील. काहीहि गृहित धरून चालायला आधार नव्हता. वेळ आलीच तर संरक्षणाची तयारी हवी होती. नकळत माझा हात रिव्हॉल्व्हरच्या होल्स्टरवर स्थिरावला होता.

टेकडीवरून खाली उतरताना नजर पायाखाली सतत ठेवावी लागत होती; पण मधूनमधून मी समोरच्या देखाव्याकडे पाहतच होतो.

दिवसा जो अनुभव आला होता त्याचीच आता पुनरावृत्ती होत होती. आधीच अस्पष्ट दिसणाऱ्या त्या नगराचा माझ्या बाजूचा काही भाग एव्हाना पारच अदृश्य व्हायला लागला होता. अंतराचा कोणता व्यस्त नियम येथे काम करीत होता कोणास ठाऊक !

पण रात्रीत उद्भवलेले ते नवे आकार मात्र तितकेच स्पष्ट दिसत होते; एवढंच नाही, तर माझं अंतर कमी कमी होऊ लागलं तसा त्यांच्यातला एक 'खरेपणा' मला जाणवायला लागला. त्या दोन दृश्यांतला फरक आता अनुभवाने स्पष्ट होत होता.

या नव्या आकारांपैकी दोन नगराची मर्यादा ओलांडून माझ्या दिशेने सरकत होते. वरवर पाहता एक दुसऱ्याचा पाठलाग करीत असावा असं दिसत होतं... महत्त्वाची गोष्ट ही होती की आमच्यातलं अंतर झपाट्याने कमी कमी होत होतं. आता काय करावं असा मला प्रश्न पडला. एका बाजूला होऊन त्यांना तसंच पुढे जाऊ द्यावं की त्यांच्या वाटेत उभं राहून त्यांची प्रतिक्रिया पहावी ?

मी असा अनिश्चित अवस्थेत उभा असतानाच ते पाहतापाहता जवळ आले. त्यांची गती माझ्या कल्पनेपेक्षा जास्त होती. पुढचा एक लाल टोळ होता... त्याचे मोठमोठे पैलूदार डोळे सरळ समोर खिळले होते आणि तो अंतर काटण्याची पराकाष्ठा करीत होता. दोन्ही पाय व चारी हात यांची विलक्षण वेगाने हालचाल होत होती. त्यांच्यामागोमाग (पाठलागावर?) काहीतरी येत होतं. त्याच्या बाह्यरेषा निश्चित नव्हत्या. चेहऱ्याच्या जागी एकच हिरवट रंगाचा काचेसारखा गोळा होता.

ते माझ्यापासून वीस एक फुटांवर असतानाच एक विचित्र अनुभव मला आला. जसा एखादा वास वाऱ्यावरून वहात यावा तसा राग, भीती, तिरस्कार, लालसा अशा भावनांचा एक संमिश्र झोत माझ्या मनावरून गेला. खरं म्हणजे आपल्या अनुभवांत असं काहीच नाही, याची कल्पनाही करता येत नाही, पण जी गोष्ट घडली ती मला नमूद करावयासच हवी. या नव्या अनुभवाने माझं लक्ष समोरच्या आकारांवरून क्षणभर विचलित झाले.

पुढचा लाल टोळ माझ्यासमोर आला; त्याच क्षणी त्याला माझी जाणीव झाली... कशीतरी धडपड करून तो माझ्यापासून पाचच फुटांवर

थांबला आणि आम्ही दोघं एकमेकांकडे पाहत राहिलो. मला थोडीशी तरी अपेक्षा होती, पण त्याला ही भेट अत्यंत अचानक आणि संपूर्ण अनपेक्षित वाटली असली पाहिजे. पुढचे चारी हात वर उचलले गेले, चेहऱ्याच्याजागी जो एक गोल होता त्याच्या मधोमध (तोंडाची ?) एक भली मोठी फट उघडली. त्याचं काडीसारखं कृश शरीर थरथर कापत होतं. मानवसदृशता फार ताणता उपयोगी नाही... पण या खुणा आश्चर्य व भीती यांच्याच होत्या, मला वाटलं.

अशा विचित्र पवित्र्यात (माझ्या कल्पनेप्रमाणे) दोन ग्रहांवरचे दोन जीव एकमेकांकडे विस्फारलेल्या डोळ्यांनी पाहत उभे राहिले.

किर्र र्र र्र ... एखाद्या प्रचंड रातकिड्यासारखा आवाज आला. तो यानेच काढला का ? असा मी मनाशी विचार करीत असतानाच एक अनपेक्षित गोष्ट घडली.

समोरचे दोन्ही आकार एकदम, एका क्षणात, नाहीसे झाले !

ज्या जागी ते दोघं उभे होते ती जागा रिकामी होती. माझा डोळ्यांवर विश्वास बसेना. मी पाचसहा पावलं पुढे टाकली, समोरच्या मोकळ्या हवेतून हात फिरवला; पण तेथे काहीहि नव्हतं. त्या रंगीबेरंगी विचित्र आकृत्यांचा काहीहि मागमूस राहिला नव्हता.

एका प्रश्नातून उत्तर निघायच्या ऐवजी दुसरा प्रश्नच निघाला होता. ते दोघं मला खरोखर दिसले तरी होते का ? का तोही एक भासच होता ? आणि मग मला जाणवलेला तो भावनांचा झोत ?

मंगळावरच्या माझ्या वास्तव्यातला तो सर्वात महत्त्वाचा क्षण होता. मी विशेष प्रयत्न न करताही मनाची एकूण घडणच त्या एका क्षणात बदलली. त्याच क्षणी मी मनाशी एक निश्चय केला की मला इथे जे जे दिसेल ते ते खरं मानूनच चालायचं. कारण उघड आहे. माझ्या अनुभवांची सत्यासत्यता पडताळून पहायला माझ्याशी कोणतं साधन होतं ? सर्व ज्ञान जर मला माझ्याच पाच ज्ञानेंद्रियांकडून मिळणार होतं तर त्यातलं खरं काय आणि खोटं काय हे मी कसं निवडणार ? किंबहुना खरं... खोटं या संज्ञानाच इथे अर्थ नव्हता. मला दिसतं, जाणवतं, स्पर्शतं, ते सर्व खरं. प्रत्येक अनुभवाची मी जर अशी शहानिशा किंवा चिकित्सा करीत बसलो तर

निर्णय केव्हा आणि कसा घेणार ? मला अजून वाटतं की मी मनात घेतलेला निर्णय योग्य आणि शहाणपणाचा होता. त्यामुळे पुढच्या काळात माझी बरीचशी दगदग आणि मानसिक यातायात वाचली.

****

माझ्यासमोरची ती विक्षिप्त दुक्कल जरी अशी अचानकपणे अंतर्धान पावली होती तरी समोरच्या नगराच्या परिसरात इतर (काही तसल्याच व काही त्यांच्याहूनही चमत्कारिक) आकारांच्या त्या अर्थहीन हालचाली चालल्याच होत्या. पुढे जाताना आता मनाला जरा धीर आला होता. मला त्यांची भीती वाटत होती हे खरं; पण त्यांना माझी तितकीच किंबहुना जरा जास्तच भीती वाटत होती, नाहीतर आता तो असा गडप कसा झाला असता ? मनातल्या मनात मी आशा करीत होतो की त्याने केवळ स्थलांतर केलं असावं. माझी माहिती इतकी अपुरी की खरा प्रकार मला कळणं शक्य नव्हतं. कदाचित भीतीने व धक्क्याने त्याला मृत्यूही आला असेल ! भिन्न संस्कृतींच्या भेटीची परिणती अशी होत असेल तर तो एक विपर्यासच होईल. मग परस्परसंबंध, संदेशन, हे सारं जमायचं तरी कसं ? तेव्हा मला आशा करीत राहणं भाग होतं, की ही त्यांच्याच शरीरातली एखादी वेगळी शक्ती असेल व तो केवळ माझ्यापासून दूर झाला असेल.

मी त्या अर्धनगराच्या जवळ येत होतो. नगरातला बराचसा भाग आता अदृश्य झाला होता; पण जेथे जेथे या आकृती दिसत होत्या. त्यांच्या आसपासचा भाग शाबूत, घन आणि खरा वाटत होता. जो काही भाग जरा स्पष्ट दिसला त्यावरून अशी कल्पना झाली की या रचना मेण किंवा दुधाळ प्लॅस्टिकसारख्या एखाद्या अर्धपारदर्शक पदार्थांच्या असाव्यात. त्या प्राण्यांचे किडकिडीत, हलके वाटणारे शरीर पाहता त्यांना मोठ्या वजनदार इमारती लागत नसाव्यात असाच ग्रह होत होता.

एका अर्धपारदर्शक भिंतीजवळ दोन लाल टोळ एकत्र उभे होते. समोरून त्यांच्यापुढे गेलो तर नुसत्या धक्क्यानेच ते नाहीसे होतील. आता थोड्या युक्तिची जरूरी होती. तसा धोका फारसा नव्हता. अजून त्यांच्या हातात शस्त्रासारखं काही दिसलं नव्हतं. ताकदीतही ते माझ्यापेक्षा जरा

कमजोरच वाटत होते. त्या दुधाळ भिंतीमागे लपून त्याचं निरीक्षण करायचं मी ठरवलं, आणि हालचालीचा एवढाही आवाज होऊ न देता मी त्या भिंतीमागे पोहचलो.

कि र्र्र्र्र ... एक आवाज आला.

कि र्र्र्र्र ... दुसरा आवाज आला.

ते काय बोलत होते ? एकमेकात भांडत होते ? का दोन मित्रात हास्यविनोद चालला होता ? का दोन प्रेमिकांची किलबिल होती ? मला कळायला काहीच मार्ग नव्हता.

कि र्र्र्र ... ! कि र्र्र्र्र ...

पुन्हा एकदा तो विचित्र अनुभव आला. एक विलक्षण आपुलकीची जाणीव माझ्या मनात झाली. एखादा मित्र, हितचिंतक.

गप्प राहणं मला अशक्य झालं. मी सावकाश उभा राहिलो. दोघांच्या पाठी भिंतीकडे होत्या. डोक्याचा मागचा भाग किटीनचा होता, एखाद्या पोर्सेलिनच्या लाल कपासारखा गुळगुळीत होता. त्याखाली होजपाईपसारखी नाजुकशी मान होती. तिच्या त्वचेवर लहान लहान केस किंवा अंकूर किंवा तणावे होती. एक हात हलकेच पुढे करून मी त्या मानेला लावला. हाताला फरसारखा केसाळ स्पर्श झाला. त्याने मान मागे वळवली. हसण्याचा प्रयत्न करीत मी म्हणालो,

'नमस्कार.'

त्याचे मोठाले डोळे गरगरले. तोंडाची मोठी भेग उकलली...

कि र्र्र...! तो म्हणाला, आणि दोघेही गडप झाले. एवढंच नाही, मी हात ठेवून उभा होतो ती भिंतही गडप झाली. माझा तोल कसातरी सावरीत मी दिङ्मूढ होऊन उभा राहिलो. मला पाहताच स्वत:ची घरंदारं घेऊन यांनी गडप व्हावं इतका कुरूप मी खासच नव्हतो ! याचं स्पष्टीकरण दुसरंच काहीतरी असलं पाहिजे... पण आणखी एक प्रयत्न वाया गेला होता हे तर खास !

मनाला जरा जास्त धीटपणा आला, तसाच एक उद्वेगही आला. जरा कोणी दिसलं की 'कि र्र्र ...! करून गडप होणाऱ्या या प्राण्याना म्हणायचं तरी काय ? त्यांच्याशी यापेक्षा जास्त धिटाईनेच वागायला हवं,

त्याशिवाय काहीच होणार नव्हतं...

माझ्या आसपास दूरवरून दिसलेलं ते नगर होतं. जरी आता मला ते दिसत नव्हतं व जाणवतही नव्हतं. नगराचा खरा आकार किंवा रचना कळणं दुरापास्तच होतं. आता दिसत होते ते वेगवेगळे तुकडे होते आणि ते केवळ एखाद्या इमारतीचेच होते असं नाही. काही ठिकाणी एखादा डोंगर-उतार दिसत होता, एकदा एक निळी नदी दिसली होती, एकदा विमानासारखं एक वाहन दिसलं होतं... विश्वातल्या कोणत्याही नगराचे हे असे भाग असू शकतील यावर माझा विश्वास बसेना.

मला सारखं वाटत होतं की समोर जे काही दिसतंय त्याचा योग्य तो अर्थ लावण्यात मला अपयश येत आहे. होणाऱ्या घटनांचा किंवा बदलाचा अर्थ मला समजत नव्हता. निरीक्षणात किंवा निष्कर्षात काहीतरी मूलभूत गफलत होत होती; कदाचित यामागे माझा अनुभव किंवा माझ्या मानवी मेंदूच्या मर्यादाही असतील. कारण काहीहि असो, या विफलतेचं रुपांतर एक प्रकारच्या रागात झालं.

एक प्रकारच्या बेफिकीरपणाने मी समोरच्या गोंधळात घुसलो. पंचवीस तीस फुटांवर एक लाल टोळ पाठमोरा उभा होता... काय करत होता मला दिसत नव्हतं... मागून जाऊन मी त्याच्या खांद्यावर (किंवा जेथे तो दोन सांधी हात धडाला चिकटला होता त्या जागेवर) हात ठेवला. हाताला फरसारखा गारसर, केसाळ स्पर्श झाला. त्याचं गोल डोकं, चक्राकार फिरलं. माझ्यावर क्षणभर स्थिरावलं.

कि र्र र्र र्र...! तो म्हणाला आणि गडप झाला. तो आणि त्याच्या आसपासचा बराचसा भाग. तेथे काहीहि राहिलं नाही. माझा राग वाढत होता. ते एक क्षणभरही माझ्यासमोर स्थिर राहत नव्हते.

मी आणखीच तावातावाने पुढे निघालो. तोंडाने काहीतरी ओरडत होतो, 'हे पहा ! मी पृथ्वीवरचा मानव आहे ! पृथ्वी ! आपल्या ग्रहमालेतला तिसरा ग्रह ! तेथून आलेला ! हे पहा ! थांबा !'

आसपासचे काही टोळ माझ्याकडे क्षणभरच वळले... त्यांची खूप मोठी कि र्र र्र र्र ... अशी सामुहिक आरोळी आली आणि सर्वच्या सर्व गडप झाले. माझ्या आसपासचा बराचसा भाग ओसाड झाला.

राग वाढतच होता. रागात मनुष्य कोणता वेडेपणा करीत नाही ?

मी होल्स्टरमधलं रिव्हॉल्व्हर काढलं, दीडशे फुटांवर उभ्या असलेल्या एका टोळावर नेम धरला आणि चाप दाबला. इतक्या अंतरावर गोळी लागण्याचा संभव कमीच होता... गोळी लागलीच तरी जखम प्राणघातक झाली नसती...

धडाड्...! खूप मोठा आवाज झाला आणि त्याचे प्रतिध्वनी सर्वत्र पसरत गेले. आणखी एक 'प्रथम' गोष्ट... मंगळावर मानवाने केलेला पहिला हत्याराचा स्फोट ! ही मालिका वाढत चालली होती...

स्फोटाचा परिणाम झाला, अगदी अपेक्षेबाहेर झाला.

आसपास वावरणाऱ्या आकारांपैकी अनेकांचं लक्ष माझ्याकडे गेलं. शांतता क्षणभरच टिकली आणि मग अगदी कानठळ्या बसवणारा 'किर्रर' चा कोलाहल चारी बाजूंनी उठला...

आणि सर्वच्यासर्व आकार क्षणार्धात नाहीसे झाले !

सर्व आकार, त्यांच्या आसपासच्या सर्व रचना, सर्व काही...

मैदान एकाएकी आणि संपूर्ण ओसाड झालं.

लांबवर मार्सशिप-१ ची उभी सुई तेवढी दिसत होती. तिच्यावरून अस्पष्ट चंद्रप्रकाश ओघळत होता. या थंडीतल्या धावपळीचा मला उबग आला होता. शिपमधली गरम केबिन, गरम कॉफी, उबदार रग, सारं आठवून मी तिकडे न परतण्याचा माझा आधीचा निर्धार सोडून दिला. तिकडच्या रोखाने मी निघालो.

दुपारी मला याच जागेवर ते अर्धरेखित नगर दिसलं होतं; रात्री मला याच जागेवर त्या चमत्कारिक, क्षणभंगुर, कि र्र र करणाऱ्या आकृती दिसल्या होत्या. आता येथे काहीहि नव्हतं. मग यापैकी खरं कोणतं ? एकाच सत्यस्थितीचे हे प्रक्षेप होते, का मला खरी गोष्ट कळलीच नव्हती ? या ओसाड मैदानात खरोखर काय होतं ?

पण हे मैदान आतासुद्धा खरोखरीच ओसाड होतं का ?

कारण एवढ्यातच माझ्या मनाला एक हलकासा स्पर्श झाला होता. मी त्याला विचार म्हणू शकत नव्हतो, भावनाही म्हणू शकत नव्हतो... ती भावनेची एक पुसट, धुसर अशी पडछाया होती...

भीती भीतीचा एक ओझरता, सरसरता स्पर्श मनाला झाला होता. ही भीती माझी नव्हती. मला त्या ओसाड मैदानात भिण्यासारखं असं काही राहिलंच नव्हतं; पण तरीही मनाला भीतीचा स्पर्श झाला होता. ती मघाचच्याच अनुभवाची पुनरावृत्ती होती.

दुसऱ्या कोणत्यातरी 'मनातील' भावनांचं प्रतिबिंब माझ्या मन:पटलावर उमटत होतं...

पुन्हा एकदा तो स्पर्श झाला. धुराच्या अस्पष्ट वलयासारखा, तरल, अस्पष्ट, जाणीवेच्या अगदी कडेवरचा...

जहरी आम्लावरून निघालेल्या बाष्पासारखा भीतीचा हा तणाव आसपासच्या निर्जन प्रदेशावरून निघाला होता, माझ्या मनाला कवटाळून गेला होता. मी विचार करीत होतो, पुढे चाललो होतो...

आणखी एकदा तो स्पर्श आला, जास्त प्रखर, जास्त तीव्र...

क्षणभर मी गांगरून जागच्याजागी उभा राहिलो...

आणि मग ती भीती आली. न दिसणाऱ्या वणव्याच्या आचेसारखी आली. चारी दिशांनी आली. मनाच्या कडीकपारी, सांदेकोपरे, सर्व विचार मार्ग या भीतीच्या प्रवाहाखाली दुथडी भरून वाहू लागले. हे असं काहीतरी होतं की ज्याच्या विरुद्ध माझ्यापाशी काहीही संरक्षण नव्हतं. एखाद्या सोसाट्याच्या वाऱ्यात पान फडफडत रहावं तसं माझं शरीर त्या अनामिक, सर्वस्वी भीतीच्या लाटात थरथरत होतं... शरीराची प्रतिक्रिया एकच एक, फार फार पूर्वी ठरली होती... श्वास जोराने यायला लागला, नाडी वेगाने दौडू लागली, हातापायांना कापरं भरलं...

मला तेथे रहाणं अशक्य झालं. भीतीची कमान वाढत होती. एखाद्या काळ्या, स्वाहाकारी भरतीसारखी ती माझ्या मनात चढत होती. मनातले इतर सर्व विचार तिच्याखाली गडप झाले...

स्वसंरक्षणाखेरीज इतर काहीहि मनापुढे राहिलं नाही...

मी टेकड्यांकडे तोंड वळवलं आणि पळत सुटलो. मला वाटतं काही वेळ मनावरचा ताबाही गेला होता. मी काहीतरी ओरडत होतो, स्वत:शी हुंदके देत होतो, हातवारे करीत होतो...

टेकड्यांच्या पायथ्यापर्यंत त्या भावनेने माझा पाठपुरावा केला.

ती आता क्षीण झाली होती. एवढाच मला आधार होता. टेकडीचा पहिला चढ मी कसातरी चढलो, आणि धापा टाकत एका खडकाला पाठ लावून खाली बसलो... किंवा कोसळलोच...

शरीर अजून थरथरत होतं. चेहरा घामाने डवरून गेला होता. हातापायांवर अजून ताबा नव्हता. नजर साफ झाली नव्हती, श्वास शरीर हादरवीत बाहेर येत होता... शरीरात त्राणच उरलं नव्हतं. आता काहीहि झालं तरी एक पाऊलसुद्धा टाकायची माझ्या पायात शक्ती उरली नव्हती... काय व्हायचं असेल ते होऊ दे !

पण काहीहि झालं नाही.

सावकाश सावकाश मी डोळे उघडले. आसपास नजर टाकली.

ते अस्पष्ट चंदेरी प्रकाशात धुतलं गेलेलं मैदान माझ्या समोर पसरलं होतं अगदी निर्जीव, निरूपद्रवी वाटत होतं...

पण आताच तेथून मी जिवाच्या भयाने पळत आलो होतो...

काय झालं होतं ? मैदानात काय होतं ?

***

थकलेल्या नजरेने मी समोर पाहत बसलो होतो. काही वेळातच सूर्य वर येईल आणि मला इथे आल्याला एक दिवस पूर्ण होईल. त्या वेळात माझी काय प्रगती झाली होती ? उत्तर मोठं निराशाजनक होतं. एकामागून एक असे निव्वळ प्रश्न उभे करण्यात मात्र मला भरपूर यश मिळालं होतं... पण त्यापैकी एकाचंही उत्तर मिळालं नव्हतं.

येथे एखादी अमानवी संस्कृती आहे का ? असली तर तिचं स्वरुप काय आहे ? येथील सर्व श्रेष्ठ जात कोणती ? त्यांच्याशी काही संदेशन शक्य आहे का...? कोणत्याही प्रश्नाला उत्तर नव्हतं.

निराशा जास्त बोचत होती, कारण माझ्यासमोर 'काहीतरी' आहे याचा मला अनुभव आला होता, खात्री पटली होती.

समोर पसरत गेलेलं, दृष्टीला बाह्यात: उजाड अन् ओसाड वाटणारं मैदान कसल्यातरी एका विलक्षण भीतीनं व्यापलेलं होतं. ही भीती इतकी प्रखर होती की मला मैदान ओलांडणं अशक्य झालं होतं. माझ्यासाठी तो

एखाद्या जहरी आम्लाचा सागरच होता. खेद याचा होत होता की ज्याचा मी अभिमान बाळगून होतो तो माझा प्रगल्भ मेंदू येथल्या समस्यांपुढे हतप्रभ ठरला होता. यावेळी मला राग आला, पण तो माझा स्वत:चाच होता.

कदाचित् ही आत्मनिंदेची पराकोटी असेल. ती अवस्था फारवेळ टिकली नाही. दुसऱ्या 'परक्या' जगातील घडामोडी एका दृष्टीक्षेपात उमगून घेण्याची महत्त्वाकांक्षाही जरा अट्टाहासाचीच होती. मनात म्हटलं, अजून मला चौदा दिवसांचा अवधी आहे. आता तर कोठे केवळ सुरुवात झाली आहे. अनुभवातून शिकणं हाच मानवी विशेष आहे. मला अजून काहीहि झालेलं नाही. उद्याचा दिवस उगवू दे...

नवा दिवस, नव्या कल्पना...

***

मला झोप लागली असली पाहिजे. डोळे उघडले तेव्हा सर्वत्र प्रकाश पसरला होता. पुन्हा एकदा ती अद्भूतनगरी आपले सोनेरी कळस, गगनचुंबी इमारती, झाडं आणि वाहनं घेऊन हजर झाली होती. मृगजळच असलं तर त्यात एक विलक्षण सातत्य होतं.

मी मंगळग्रहावरचं तिसरं जेवण केलं आणि एक प्रकारच्या निर्धाराने टेकडीच्या उतारावरून खाली निघालो. जवळ जाताच अदृश्य होणारं हे नगर म्हणजे आहे तरी काय हे मी आता पाहणार होतो.

जवळ जात चाललो तसा नगराचा एकएक भाग अदृश्य होऊ लागला. घटना अपेक्षित असली तरी धक्का देणारी खास होती; पण मी माझा मार्ग बदलला नाही किंवा थांबलोही नाही. टेकडीवरून पाहताना मी त्या नगराच्या साधारण मर्यादा नीट पाहिल्या होत्या. आता मी माझ्या हिशोबाप्रमाणे नगराच्या परिसरात आलो होतो.

जरा सावकाश, पण तितक्याच निर्धाराने मी पुढे चालत राहिलो. मला जरी काही जाणवत नव्हतं, तरी आता माझ्या आसपास, चारी बाजूंना त्या नगराच्या उत्तुंग इमारती होत्या. मनात एक विचार आला. जर ते नगर मला अदृश्य असेल, तर त्या लोकांनाही मी अदृश्यच असणार ! या विचाराने मनाला जरासा धीर आला.

सर्व चित्तवृत्ती अतिशय सावध होत्या, जे काही होईल ते अगदी अनपेक्षित असणार असं मी गृहित धरूनच चाललो होतो; त्यासाठीच मन व शरीर शक्य तेवढं सावध, तोलावर ठेवण्याचा प्रयत्न करीत होतो... एक बारीकसा बदल झाला, किंवा पुरा व्हायच्या आतच नाहीसाही झाला... पण मला ते जाणवलं होतं. मनात एक क्षणभर एक आनंदाची, समाधानाची गोड भावना उमटून गेली होती. कालच्या भीतीसारखीच हीही परकी होती. बाहेरची होती; सुखद असली तरी भयावह होती. एखाद्या गोष्टीचा मनापासून आनंद व्हावा त्यासारखं माझं मन फुलून आलं होतं; पण माझ्याभोवतीचं सर्व मैदान पार उजाड, ओसाड होतं. तेथे कोणीही आणि काहीहि नव्हतं.

जरा दबकतच मी पुढे निघालो. पुन्हा एकदा एक झोत आला. यावेळी विलक्षण चीड माझ्या मनात उत्पन्न झाली... आणखी जरा पुढे मनात राग आला... मला प्रत्यक्ष शारीरिक असा काहीहि धोका पोहचत नाही अशी माझी खात्री पटल्यावर मला या अनुभवात जरा गंमतच वाटायला लागली होती... भावनांच्या सप्तरंगी झोतातून माझं मन जात होतं, राग, प्रेम, आनंद, तिरस्कार, चीड, उद्वेग, भीती, मत्सर... आणि यांच्या कितीतरी संमिश्र छटा !

हा बेफिकिरपणा, हा गाफिलपणा चांगला नव्हता. वास्तविक असल्या काही प्रकाराविरुद्धच मी सावध राहायचं ठरवलं होतं; पण आता मनावर एक प्रकारची गुंगी चढल्यासारखी झाली होती. या वेगवेगळ्या भावनांचा आस्वाद घेत मी त्या मोकळ्या मैदानात हिंडत होतो. काहीतरी चुकलं आहे हे माझ्या केव्हा ध्यानात आलं ? मला सांगता येत नाही. मधेच एखादा असा एक क्षण आला की हव्या त्या दिशेकडे मला जाता येईना. ती एक दिशा सोडून बाकी सर्व मोकळ्या होत्या. त्या एका दिशेस मात्र एखादी अदृश्य भिंत उभी होती. मी जरा मागे सरलो, पाचसात पावलं उजवीकडे टाकली व परत वळून पुढे जायचा प्रयत्न केला... पण नाही ! तेथे काहीतरी मला अडवत होतं, पुढे जाऊ देत नव्हतं...

मेंदू एकदम खडबडून जागा झाला. आतापर्यंत माझी हालचाल स्वतंत्र होती, आता त्यात इतर कोणीतरी हस्तक्षेप करीत होतं. येथे आल्यापासून शारीरिक पातळीवर झालेला हा पहिलाच स्पर्श होता.

मी मागे वळलो आणि टेकड्यांच्या दिशेने निघालो.

मनात आशा होती आणि शंकाही होती, आणि मनात आलेली शंकाच खरी ठरली. पन्नासएक पावलं टाकली असतील तोच पुन्हा एकदा माझी पावलं अडखळली, मंदावली, आणि थांबली. मनातून मी कितीही जोर केला तरी पावलं ती एक आज्ञा पाळायला तयार नव्हती. माझा टेकड्यांकडे जायचा मार्ग रोखला गेला होता, बंद झाला होता.

मला वाटतं एक क्षणभर भीतीने माझं भानच हरपलं, एकाएकी एका भयानक पण असह्य सापळ्यात अडकल्याची, गुदमरल्याची भावना मला जाणवायला लागली. काहीतरी करून यातून सुटलंच पाहिजे ! हा एकच विचार मनात थैमान घालीत होता, आणि त्या टोचणीखाली मी मैदानावर सैरावैरा पळायला लागलो... प्रत्येक दिशेलाच तो अडथळा जाणवत होता. सर्व बाजूंनी माझी कोंडी झाली होती... उत्क्रांत मेंदूचा अभिमान एका क्षणात गळून गेला आणि पिंजऱ्यात सापडलेल्या एखाद्या हिंस्त्र श्वापदासारखा मी अर्थहीन धडपड करू लागलो. केवळ दमछाट होण्यापलीकडे काहीच निष्पन्न झालं नाही.

हा जर कोणी शत्रु असला तर तो मला दिसत नव्हता. त्याचं साधन काय होतं हेही दिसत नव्हतं, एका साधारण चाळीस फूट व्यासाच्या वर्तुळात मी कोंडला गेलो होतो. त्यातून बाहेर पडू शकत नव्हतो. एवढी एकच गोष्ट मला समजली होती.

शेवटी धडपड थांबली. पुढे काय होणार या धास्तीने आसपास मोकळ्या (!) मैदानावर नजर फिरवत मी स्तब्ध उभा राहिलो.

क्षीण सूर्यप्रकाश वरून ओघळत होता. हिरवट आकाशात असंख्य चांदण्या चमकत होत्या. त्या मैदानाच्या मध्यभागी मी उभा होतो. एखाद्या प्राचीन संस्कृतीतला, पुरातन व भग्न नगरातला एकच संस्कृतीचा अवशेष रहावा तसा एखाद्या पुतळ्यासारखा.

ही निश्चलता स्वेच्छेची होती का नाही हेही मला समजत नव्हतं. कृतीच्या उर्मी जेथे उगम पावतात त्या चैतन्यकेंद्रातच हा पाश घुसला असावा. माझ्या सर्व शरीरावरच एक चमत्कारिक बधीरपणा पसरला होता. मघाशी मनात उसळलेल्या विकारांचा क्षोभ आता शमला होता. जणु काही

हे शरीर, ही काया माझी नव्हतीच... मी, कोणीतरी एक स्वैर अस्मिता, या प्रकाराचं एक अलिप्त निरीक्षण करीत होतो...

मनातला थंडपणा इतर इंद्रियांवरही पसरत चालला. पायांना खालच्या खडकाळ मैदानाचा स्पर्श जाणवेनासा झाला. शरीर हवेत अधांतरी तरंगत असावसं वाटायला लागलं. इतका वेळ शरीराच्या उघड्या भागावर थंडीने काटा येत होता, तीही जाणीव नाहीशी झाली. मैदानावरच्या वाऱ्याचा आवाज क्षीण झाला. हळुहळू लुप्त झाला आणि मग शेवटी नजर... सर्व आसमंत अंधारून आल्यासारखा वाटला. मी डोळे मिटल्याचं मला स्मरत नाही... पण डोळ्यातून काहीहि दिसेनासं झालं... माझ्या आसपासचं जग, आसपासची त्रिमीत स्मृती विरघळत होती, नाहीशी होत होती...

अगदी शेवटल्या स्वतंत्र क्षणी मनात एक खेदाचा विचार येऊन गेला... मी पूर्वीच यानाकडे परतायला हवं होतं...!

***

विजेच्या शॉकसारखा एक तीव्र धक्का शरीराच्या कणाकणातून गेला. या प्रलयंकारी ताणाखाली हात, पाय, पोट, मान, सर्व स्नायू एखाद्या चरकात घातल्यासारखे आखडले, चुरमडले... वेदनेने माझ्या तोंडून किंकाळी बाहेर पडत असतानाच माझे डोळे खाडकन् उघडले.

आणि मी जवळजवळ मूर्च्छितच पडलो.

हा भास आहे की हे स्वप्न आहे की हा मृत्यूनंतरचा नरक आहे याचा भयभीत मन विचार करीत होतं आणि माझी विस्फारलेली नजर चारी दिशांना भिरभिर फिरत होती.

आसपास प्रकाश होता, गडबडगोंधळ होता, यंत्रे होती.

आणि 'किर्र्रर्र' आवाज करणारे अनेक लाल टोळ होते.

हा भास नव्हता, ही वस्तुस्थिती होती आणि मला धोका होता. हा निष्कर्ष मी कोणत्या आधारावर काढला मला माहीत नाही. कदाचित् अपरिचित ते सर्व धोक्याचं हा मानवी संकेतही काम करीत असेल... मनात विचार आला तो स्वसंरक्षणाचा होता. झटपट रिव्हॉल्व्हर हातात घेतलं पाहिजे, मी मनाशी विचार करीत होतो... आणि मी मनाशी विचारच करत

राहिलो. शरीराकडून कोणतीही कृती झाली नाही. मेंदूवरची ती बधीरता, ती गुंगी अजून तशीच होती...

एक प्रकारच्या असहाय्यतेने मी आसपास पाहिलं...

मी एका दुधाळ चौरसावर उभा होतो. एका अवाढव्य यंत्राचा तो भाग-प्लॅटफॉर्म... असावासा वाटत होता; पण एवढं पाहिल्यावर माझं लक्ष समोरच्या त्या टोळांकडे वळलं...

सर्वच जण जरी कि र्र्र्र... असा कर्कश आवाज काढीत होते तरी त्यांच्यात उघडपणे दोन गट दिसत होते. माझ्यासमोर, सुमारे दहा फुटांवर दहा अकरा टोळ ओळीने उभे होते; प्रत्येकाचे चारही हात हवेत जोरजोराने हलत होते. सर्व कशाने तरी प्रक्षुब्ध झालेले दिसत होते; सर्वांच्या लाल चेहऱ्यावरच्या फटी उघडत मिटत होत्या.

या उलट त्या यंत्राच्या (!) कंट्रोलपाशी टोळांचा एक गट शांतपणे उभा होता. त्यांचेही गरगरीत डोळे माझ्यावर खिळले होते; पण त्यांच्या पवित्र्यात एक सहजपणा होता, एक निश्चिंतता होती.

त्यांच्यापैकी एकजण जरा पुढे वाकला, त्याने समोरच्या अजस्त्र फलकावर एका हाताने काहीतरी बदल केला... मला त्याचा परिणाम तात्काळ जाणवला. शरीरावर पडलेली तात किंचितशी... अगदी किंचितशी... सैल झाली होती. थांबलेलं रक्त रक्तवाहिन्यातून परत एकदा धावायला लागलं. हातापायांची रग सावकाश ओसरत गेली. मी जराशी हालचाल... तीही अतिशय कष्टाने... करू शकत होतो.

'कि र्र्र्र...!' त्यांचा आवाज दालनात घुमत होता.



***

मनात एका क्षणात शब्दशः हजारो विचार येऊन गेले...

समोर दिसतंय ते खरं मानलं पाहिजे... ही वस्तुस्थिती आहे. कोणत्यातरी एका पातळीवर आम्ही एकमेकांना दृगोच्चर झालो आहोत...

त्यांनी त्यासाठी काहीतरी यंत्र वापरलं आहे. माझी इच्छाशक्ती त्यांच्या ताब्यात आहे... ते मला जसे धोक्याचे आणि भीतीदायक वाटतात तसा मीही त्यांना वाटत असलो पाहिजे...

क्षणभर जागा उलट्या करा... समजा पृथ्वीवरच्या एखाद्या प्रयोग शाळेत असा एखादा लाल टोळ अचानक उपस्थित झाला असता तर...? सर्वसाधारण माणसांनी केवळ भीतीपोटी, त्याचा काहीहि अपराध नसताना! त्याला ठार केलं असतं !

पण शास्त्रज्ञ थांबले असते... त्याच्याकडून एखादी खूण येण्याची त्यांनी वाट पाहिली असती... आपण विचारी प्राणी आहोत, कोणत्यातरी संस्कृतीचे घटक आहोत हे सिद्ध करण्याची त्यांनी त्याला संधी दिली असती, सावधगिरी बाळगून !

आता तेच घडत आहे !

ते मला एक संधी देत आहेत; तिचा मी योग्य उपयोग केला तर मला जीवदान मिळेल; नाहींतर... मृत्यू !

विचारांच्या आवेगाने मेंदू अक्षरश; ओरबाडून निघत होता. मी वेडेपणाच्या कड्यावर लटपटत होतो. एक भयंकर विचार मनात येऊन गेला. आता संधी आहे तोच रिव्हॉल्व्हर उचलावे, समोरचे हे लाल टोळ चटाचट टिपून घ्यावें आणि येथून पोबारा करावा... पण त्यात मला कधीही यश आलं नसतं. हात एखाद्या मेणाच्या बाहुलीसारखे लिबलिबीत पडले होते. त्यांच्यात हवा तो जोर नव्हता... आणि शिवाय, मी त्यासाठी मंगळावर आलोच नव्हतो !

कशाने त्यांचं समाधान होईल ? एक आकृती ? पण कशाची ? आमच्या शास्त्रातल्या संज्ञा त्यांना माहीत नसणार. जागतिक किंवा वैश्विक संकेताची आकृती हवी... एखाद्या अणूचा नकाशा ? पण त्याचक्षणी मला प्रश्नाचं उत्तर सापडलं...

सूर्याची ग्रहमाला ! ज्या ग्रहमालेत त्यांचा व माझा, दोघांचेही ग्रह फिरत होते, जी दोघांना ! समान व ज्ञात होती.

मी हात खिशाकडे नेला...

ही माझी दृश्य अशी पहिलीच हालचाल होती. पॅनेलजवळ उभ्या असलेल्या टोळाचे हात एकदम पॅनेलवर गेले, पण त्याने काही बदल केला नाही. फक्त तो सावध होता.

मी खिशातून कागद, पेन्सील काढली. डाव्या तळहातावर कागद

पसरला, उजव्या हातात पेन्सील घेतली. दोन्ही हात थरथर कापत होते. सूर्य व ग्रह यांची एक ओबडधोबड प्रतिकृती काढली आणि त्यातील तिसऱ्या ग्रहावर फुली केली व मग तो कागद त्याच्यासमोर धरला...

दालनातली किर्रर्र... थांबली होती. त्या विलक्षण शांततेत पॅनेलजवळच्या टोळांनी हलकेच पुढे येऊन तो कागद पाहिला.

माझा श्वास छातीत अडकला होता.

त्यांच्या निर्णयावर मी जगणार की मरणार हे अवलंबून होतं. ते बराच वेळ त्या कागदाकडे पाहत होते.

कि र्र र्र र्र... त्यांच्यातला एक सावकाश म्हणाला.

आणि पॅनेलजवळच्या टोळाने आपला हात खाली घेतला. त्यांनी मला जीवदान दिलं होतं.

***

मी त्यांना 'किरकिट' हे नाव वापरणार आहे. त्यांच्याविषयी विचार करताना प्रथमपासूनच हा शब्द माझ्या मनात आला होता आणि आता त्यांचा इतका सहवास घडल्यावरही तो शब्द बदलायचं मला प्रयोजन वाटत नाही. तो शब्द थोडक्यात त्यांचं पूर्ण वर्णन करतो.

किरकिट शास्त्रज्ञांना मानसिक संदेशनाचं उपकरण बनवायला सहा दिवस लागले. आपल्या शास्त्राच्या दृष्टीने ती झेप नेत्रदिपक वाटेल; पण त्यांची या शाखेत आधीच बरीच प्रगती झालेली होती.

यापुढचा भाग लिहिताना माझा जरासा गोंधळ होणार आहे, कारण प्रत्येक प्रसंग (सुरुवातीस) जेव्हा घडत गेला तेव्हा मला त्याचं खरं आकलन न झाल्यामुळे मनात एक ठाम पूर्वग्रह निर्माण झाला होता, नंतर संदेशन प्रस्थापित होऊन स्पष्टीकरण झाल्यावरही काही प्रसंगावर पूर्वग्रहांची ही छाया आढळेल, पण असो.

पुढचे सहा दिवस कोणाचा धीर आधी संपतो याची जणु काही एक स्पर्धा लागली होती. मी आणि ते दोन किरकिटशास्त्रज्ञ समोरासमोर उभे होतो. पण आमची उत्पत्ती, हेतू, एकूण सर्व जीवनच इतक्या भिन्न प्रकृतीचं होतं की दोघात समान असं काही नव्हतंच. प्रत्येक कृतीचा गैरसमज

होण्याचा धोका होता... आणि कित्येक वेळा असा प्रसंग आलाही. गेले कित्येक तास माझ्या पाठीला ऑक्सिजनचा सिलींडर होता. त्याचं वजन जरी फार नव्हतं तरी पाठीला आता रग आली होती. मी जेव्हा पुढचे पट्टे सोडून सिलींडर पाठीवरून काढला तेव्हा ते दोघंही घाबरून एकदम मागे सरले आणि त्यांचे हात दालनातल्या काही विचित्र यंत्रावर स्थिरावले... ती शस्त्रे असली पाहिजेत यात मला कोणताच संशय नव्हता. पुढचे काही क्षण मोठे आणीबाणीचे होते. मी सिलींडर अलगद खाली ठेवला, दोन्ही हात झटकले व मग सावकाश उभा राहून त्यांना दोन मोकळे हात दाखवले...

कमरेचं होल्स्टर काढताना, खिशातील पेन काढताना, माझा कॉन्सेंट्रेटेड फुड टॅब्लेटचा फॅक फोडताना, किंवा बर्फ वापरताना, प्रत्येक वेळी वातावरणात हा ताण उत्पन्न होत होता; पण अर्थात पुढे पुढे असे प्रसंग कमी आले. मी एक विचारी प्राणी आहे, माझ्या मनात कोणताही दुष्ट विचार नाही. माझ्यापासून त्यांना धोका नाही हे त्यांना पटलं. कदाचित विश्वाच्या तर्कशुद्ध मांडणीवर विश्वास ठेवणारे असे ते शास्त्रज्ञ होते म्हणून हे जास्त सोपं गेलं असेल... असो.

एकदोन दिवस उलटल्यावर मला त्या दोघांच्या हालचालीत एक घाई, उत्कंठा, काळजी दिसायला लागली. मला आता इतपत समज आली होती आणि मला हेही उमगलं की त्यांच्या काळजीचं कारण मी नाही, दुसरंच काहीतरी आहे. त्या दालनात आल्या आल्या त्यांनी प्रवेशद्वार बंद केलं आणि दोघांच्यात काहीतरी महत्त्वाची कुजबुज (खरोखर कि र्र र्र... राट. असा शब्दच वापरायला हवा.) सुरू झाली. त्यांच्यात काहीतरी मतभेद होता. वाद कशासंबंधी चालला होता आणि त्याचा निर्णय काय लागला या दोन्ही बाबतीत मी सारखाच अनभिज्ञ होतो.

त्यांच्यातला एकजण पॅनेलपाशी आला. त्याचे हलके वाटणारे चारी हात पॅनेलवर भराभर काहीतरी हालचाली करीत होते. पॅनेलवर एक पांढरा चौकोन उजाळला. तो किरकिट मागे सरला आणि त्याने मला खूण केली, 'ये आणि पहा.' अभिप्राय अगदी बोलका होता.

मी पॅनेलजवळ आलो. टेलिव्हिजनसारखं ते एखादं यंत्र असावं, मला वाटलं... त्याची गुणवत्ता आपल्या सध्याच्या यंत्रापेक्षा खूपच कमी

होती; पण सहा पायांच्या (किंवा चार हातांच्या) किटकांनी ते बनवलं होतं ही गोष्ट त्यांना खासच भूषणावह होती! (खरी परिस्थिती समजण्याआधीचा हा विचार आहे; हे वाक्य वाचून आता माझी अवस्था जराशी चमत्कारीक होते; पण मी ते वाक्य तसेच राहू देतो... मानवाची स्वत:संबंधी जी एक कल्पना आहे ती तेथे योग्य स्वरुपात आली आहे.)

पण यंत्राजवळ आल्यावर हे सर्व विचार कोठल्याकोठे विरघळले.

यंत्रात इमारतीबाहेरचा, एका प्रशस्त चौकाचा देखावा दिसत होता. रस्त्याच्या दुतर्फा, आणि लांबवरपर्यंत फिकट रंगाच्या, पेस्टेल शेडच्या अनेक इमारती दिसत होत्या... पण आता तिकडे पहायला मला वेळ नव्हता. चौकोनाच्या मध्यभागी दोनशे... अडीचशे लाल टोळांचा एक जमाव घुसळत होता. सर्वांच्या चेहऱ्यातल्या मोठमोठ्या फटी उघडत मिटत होत्या; सर्वांचे हात भिरभिऱ्यांसारखे फिरत होते. माझ्याशेजारी उभ्या असलेल्या किरकिटने पॅनेलवर काहीतरी हालचाल केली.

किर्र्र्र....! किर्र्र्र...!

त्याने ऑडिओ सर्किट सुरू केलं होतं. कानठळ्या बसवणारा प्रचंड आवाज यंत्रातून दालनात शिरला, घुमायला लागला. त्या दृश्याचा अर्थ समजायला मला काही सेकंद लागले आणि मग माझा मेंदू भीतीने अक्षरश: थिजून गेला. बाहेर ते लाल टोळ निदर्शने करीत होते. मी प्रथम दालनात आलो तेव्हा समोर रांगेने उभे असलेल्या दहा बारा टोळांची भीतीच व रागाची प्रतिक्रिया माझ्या चांगली ध्यानात होती, आणि आता ते बाहेर जमून माझा नाश करण्याची एकमुखाने मागणी करीत होते. मोर्चा! (पुन्हा एकदा, किती मानवासारखं! समजा एखाद्या शहरातल्या एखाद्या दवाखान्यात किंवा प्रयोगशाळेत एखादा राक्षसी प्राणी आणलेला आहे अशी वार्ता पसरली की तेथे काय होईल? कल्पनाच केलेली बरी!)

किरकिट शास्त्रज्ञाने यंत्र बंद केलं. दालनात शांतता झाली, व मग त्यांनी आपले प्रयत्न सुरू केले. अपयशाला ते कचरले नव्हते, अडचणी पुढे नमले नव्हते, लोकांच्या विरोधाला ते जुमानत नव्हते... मला वाटतं पृथ्वी काय किंवा मंगळ काय... सर्व शास्त्रज्ञ इथून तिथून सारखेच! चिवट, महत्त्वाकांक्षी, दुराग्रही आणि बुद्धीमान!



वर सांगितलंच आहे की विचारसंदेशनाचं उपकरण बनवायला त्यांना सहा दिवस लागले; पण तोपर्यंत त्यांच्या मनातली माझ्याबद्दलची धास्ती पार नाहीशी झाली होती. खुणांची एक भाषा आमच्यात आपोआप तयार झाली होती. साध्या सूचनांना ती पुरेशी होती. तीही उपयोगी पडली नाही तर ओबडधोबड चित्रांनी काम भागत होतं.

चित्र काढण्याचा पहिला प्रसंग खुर्चीच्या वेळी आला... म्हणजे जेव्हा खुर्चीचा किंवा कोणत्याही आसनाचा अभाव मला जाणवू लागला तेव्हापासून आला. या किरकिटांना बसण्याची आवश्यकताच नव्हती. विश्रांती घ्यायच्या वेळी ते मधले दोन हात (किंवा पाय) खाली टेकवीत असत व जरा ओणवे होत असत. पहिले एकदोन दिवस मी जमिनीवर, मोकळ्या जागी बसून कशीतरी वेळ भागवली. पण शेवटी ते इतकं गैरसोयीचं व्हायला लागलं की मी खुर्चीसाठी प्रयत्न करायचं ठरवलं. खुर्ची म्हणजे चार आधारावर उभा असलेला एक प्लॅटफॉर्म; पण त्याची रचना, आकार, शक्ती, उपयोग या सर्व ॲबस्ट्रॅक्ट कल्पना आहेत. त्या त्यांच्यापर्यंत पोहचवायला मला जवळजवळ एक तास लागला; पण त्या पासून एक अनपेक्षित फायदा झाला. शास्त्राच्या एका अकल्पनीय शाखेतली त्यांची प्रगती मला पहायला मिळाली.

मी कागदावर काढलेलं चित्र सुमारे दोन इंच लांबीरुंदीचे होते. त्याला कोणत्याही ऑबजेक्ट ड्रॉईंगच्या परीक्षेत पारितोषिक मिळालं नसतं; पण त्यावरून खुर्चीची पुरेपूर कल्पना येत होती. मला ही वस्तू हवी आहे हे त्यांच्या ध्यानात आलं. त्यांच्यापैकी एकाने तो कागद बराच वेळ निरखून पाहिला आणि मग तो एका यंत्रापाशी गेला. स्वत:च्या डोळ्यावर त्याने एक दुधाळ शिरस्त्राण चढवलं व तो शांत उभा राहिला. यंत्राच्या मध्यभागी एक गोल, सपाट असं चाक होतं. त्यावर एका बाजूने एका दुधाळ पदार्थाचा सुमारे तीन इंच व्यासाचा एक लपका पडला आणि वेगवेगळे यांत्रिक भाग त्यावर क्रिया करू लागले. माझ्या डोळ्यांसमोर एक खुर्ची घडवली जात होती... अगदी चित्रासारखी... दोन इंच उंचीची !

अर्थात् मग त्यांनी ही चूक सुधारली. मला हवी तशी खुर्ची बनवून

दिली; पण माझे लक्ष त्या यंत्राने वेधून घेतले होते. आपण उद्योगनिर्मितीसाठी कॉम्प्युटर वापरतो... त्याला दिलेल्या आज्ञांप्रमाणे तो नकाशाबर हुकूम प्रतिकृती तयार करतो. किरकिट शास्त्रज्ञ त्याही पुढे गेले होते. त्यांचा मेंदू ते यंत्राला जोडू शकत होते व त्यांनी मनात आणलेला विचार ते प्रत्यक्षात आणू शकत होते.

मला एकदम वाटू लागलं की मानसिक क्रिया-प्रक्रियांचा त्यांचा अभ्यास जर इतका सखोल असेल, मानसिक शक्तीवर जर ते असं नियंत्रण घालू शकत असतील तर विचार-संदेशनाचं यंत्र बनवणं त्यांच्या आवाक्याबाहेरचं नाही !

आणि तासातासागणिक त्याची निकड भासायला लागली होती. अनेक अनुत्तरीत प्रश्न मनात गर्दी करायला लागले होते...

मंगळावर किरकिट एवढी एकच जात आहे का ? नसली तर आणखी जीवसृष्टी कशी आहे ? त्यांची शासनयंत्रणा कशी आहे ? ही प्रयोगशाळा खाजगी होती का शासकीय होती ? त्यांचा समाज कसा होता? वैयक्तिक आयुष्य कसं होतं ? शास्त्रीय प्रगती कोठपर्यंत आली होती ? अणुशक्ती त्यांनी हस्तगत केली होती का ? आंतरिक्ष प्रवासात ते यशस्वी झाले होते का ? त्यांच्याशिवाय विश्वात इतर जीवसृष्टी आहे, विचारी अस्तित्व आहे, यांची त्यांना कल्पना होती का ? प्रश्नांची मालिका लांबलचक, न संपणारी होती.

***

अखेर ते उपकरण एकदाचं पुरं झालं. त्यात वापरण्यात आलेल्या शक्ती आणि त्यांचं नियंत्रण यात मी अगदी अनभिज्ञ होतो. कारण येथे एक संपूर्ण अमानवी शास्त्रीय उपपत्ती कार्य करीत होती.

यंत्राची रचना घाईत केलेली व म्हणून ओबडधोबड अशी होती. यंत्रातला मुख्य भाग म्हणजे सुमारे तीन फूट व्यासाचा, चार फूट उंचीचा, संपूर्ण पारदर्शक असा एक दंडगोल होता. त्याला अनेक बाजूंनी अनेक लहान मोठे शक्तीवाहक जोडलेले होते. त्या दंडगोलासमोर एक पसरट व उतरतं पॅनेल होतं, त्यावर अनेक रंगाची बटणं होती आणि शेवटचं, त्या

दंडगोलाला जोडलेली दोन शिरस्त्राणं होती. त्यातलं एक माझ्यासाठी होतं, दुसरं किरकिटसाठी होतं.

किरकिटांची आपापसात संदेशनाची पद्धत काय होती याचा मला अजून उलगडा झाला नव्हता. 'किर्ररर...' याशिवाय एकही आवाज त्यांनी काढलेला मी ऐकला नव्हता. त्यांची संस्कृती प्रगल्भ होती, विचार उच्च दर्जाचे असणार, त्यांच्या वहनास हे साधे आवाज पुरेसे पडत असतील का याची मला शंकाच होती. त्यांच्यात टेलीपथीची थोडीबहुत शक्ती असावी असा माझा कयास होता.

पण आता ते दोन भिन्न वंशीय मनाचा संयोग करण्याचा प्रयत्न करीत होते, आणि त्याच्या यशाबद्दल मात्र मी साशंक होतो. विचार म्हणजे काही एखादं द्रव नाही की ते एका पात्रातून दुसऱ्यात ओतावं. विचार ही एक प्रतिक्रिया आहे... विचाराच्या निर्मितीत पूर्वानुभव, स्मृती, निरीक्षण, अपेक्षा या सर्वांचा भाग असतो. विचार जन्म घेताघेता पुढच्या विचारांवर परिणाम करीत असतात. एका सेरेब्रल सिस्टीममधील प्रवाह दुसऱ्या अगदी वेगळ्या सिस्टीममध्ये केवळ पुनर्रेखित करण्याने काही साध्य होईल यावर माझा विश्वास नव्हता. कारण बाहेरून आलेले हे संकेत सर्वस्वी परके, विसंगत असणार. त्यांच्यासाठी जो मेंदू घडवलेला नाही त्यातील विचारमार्ग हे एखाद्या आम्लासारखे जाळून टाकतील... संकेत उमटलेच तर ते विकृत असतील...

***

पण मग मला समजलं की एवढं धास्तावण्याचं काहीच कारण नव्हतं. माझे किरकिट मित्र इतके महत्त्वाकांक्षी नव्हते. त्यांनी जी रचना केली होती ती प्रत्यक्ष मानसिक संदेशनापेक्षा... टेलीपथीपेक्षा जरा कमी कार्यक्षम पण हजार पटींनी जास्त सुरक्षित होती.

त्यांनी योजलं होतं ते हे होतं... मनातील विचारांच्या शक्तीचं अन्य शक्तीत रुपांतर करून मनातल्या विचारांना एक दृश्य, त्रिमित आकार द्यावयाचा : क्षणाक्षणाला मनात बदलणारे विचार एका हालत्या, सजीव आकृतीद्वारा मूर्त स्वरूप घेत होते. एका गोष्टीवर मन स्थिर ठेवणं किती

कठीण आहे याचा अनुभव मला लौकरच येणार होता.

तेव्हा किरकिटांनी ते यंत्र सुरू केले. आमच्या दोघांच्या मस्तकावर ती शिरस्त्राणं होती. मला स्वत:ला शक्तीचा कोणताही उत्सर्ग जाणवला नाही. शेजारच्या किरकिटाने पॅनेलवर एक हालचाल केली. मधला पारदर्शक दंडगोल कसल्या तरी किंचित पांढुरक्या, पण प्रकाशमान... ल्युमिनिसंट अशा कणांनी भरला...

आणि एकाएकी त्यात एक चित्रं आलं...

ती प्रयोगशाळा त्यातल्या तो यंत्राचा प्लॅटफॉर्म व त्यावर एकाएकी अवतीर्ण झालेली माझी आकृती... सगळं स्पष्ट होतं...

तो माझ्या आगमनाचा इतिहास विचारत होता.

***

किरकीट यंत्र बंद करून वाट पाहत होता. त्याची उत्सुकता नैसर्गिक्र तर होतीच, शिवाय सर्वसामान्य किरकिट जनतेचा रोष पत्करून त्याने हा प्रयोग केला होता. शेवटी तो जर त्याचं समाधान करू शकला तरच त्याचा हा 'गुन्हा' समर्थनीय ठरला असता, माफ झाला असता...

पण माझ्यापुढे वेगळाच प्रश्न होता.

त्याला मी कोठपासून आणि किती माहिती देणं योग्य ठरेल ? कोणत्याही अर्धवट बिंदूपासून मी सुरुवात करू शकत नव्हतो. केवळ मैदानात आलो असं दाखवण्याने भागत नव्हतं, मग त्यामागोमाग माझं यान आलं, मग मंगळतळ आला, चंद्रतळ आला, आपली सर्व अवकाश प्रवास यंत्रणा आली... पण तेथेही थांबता येत नव्हतं. त्यामागची आपली संस्कृती आली आणि त्याहीमागचा मानवाचा पृथ्वीवरचा इतिहास आला... पण येथेही थांबत नव्हतं. पृथ्वीवरच जीवोत्पत्ती, पृथ्वीची स्वत:ची निर्मिती, एवढंच काय विश्वातली द्रव्याची निर्मिती... तर्काचं टोक येथे येत होतं.

पण मग मनात द्वैत आलं. मानवांच्या तुलनेने हे किरकिट सुधारलेले होते का ? शास्त्रात आपल्यापेक्षा जास्त प्रगत होते का ? आजवर जर ते पृथ्वीवरच्या संस्कृतीसंबंधी अज्ञानात असतील तर त्यांचं हे अज्ञान दूर करण्यात मानवांना काही धोका निर्माण होत होता का ? 'मानव' या

भूमिकेतून माझं कर्तव्य काय होतं ?

ही एक बाजू झाली. मी मानव होतो; पण शास्त्रज्ञही होतो. शास्त्रज्ञ या नात्याने शास्त्राच्या प्रगतीसाठी माझ्यावर काही किमान जबाबदाऱ्या होत्या की नाही ? ही जी एक वैश्विक परंपरा होती, जी एक शास्त्रसन्मुख श्रद्धा होती, तिची श्रेणी कोणती होती ? वरची का खालची ? प्रथम काय येत होतं ?

हे द्वैत आजचं नाही. त्याचा वारसा दोन हजार वर्षांपूर्वीच्या अर्कीमीडीजपर्यंत पोहचतो. शास्त्रीय व राजकीय (किंवा सामाजिक) मूल्ये ही नेहमीच परस्परांना छेदत आली आहेत आणि याशिवाय माझ्यासमोर त्या किरकिट शास्त्रज्ञाचं उदाहरण होतं. शास्त्रीय जिज्ञासेसाठी त्यानेही जनरोष ओढवून घेतला होताच... माझा निर्णय घेतला गेला.

विश्वाच्या उपपत्तीची... कॉस्मॉलॉजीची... माझी कल्पना मी त्याच्यासमोर साकार करायचं ठरवलं. मी मान हलवताच त्याने पॅनेलवरची ती हालचाल परत एकदा केली. यंत्र सुरू झालं.

***

इतर कोणीही काहीहि म्हणतो, माझा स्वत:चा चक्रीय उपपत्तीवर सायक्लिकल थेअरीवर ठाम विश्वास आहे, अर्थात आताच्या क्षणी ते महत्त्वाचं नव्हतं; पण मी काहीहि मागे ठेवलं नाही.

यंत्र सुरू होताच माझ्या कानशिलातून... जेथे शिरस्त्राणाची टोके मस्तकाला स्पर्शत होती... बारीक झिणझिण्या यायला लागल्या. मी मनात एक अवाढव्य, प्रखर, धगधगता, लवलवता द्रव्यधनाचा मेघ आणला. मनातले विचार अगदी हुबेहूब चित्रित होत होते...

त्या मेघाचा स्फोट... तारकाचंक्रांची निर्मिती... आणि द्रव्याचे ताऱ्यात संकलन... ग्रहांची निर्मिती... आणि मग सूर्यमाला...

काही वेळ मी सूर्य व त्याभोवतीचे नऊ ग्रह तसेच ठेवले.

आणि झूऽऽऽम् ! पृथ्वी, तिसरा ग्रह जवळ आणला.

वायूंचे द्रवीभवन, द्रव्याचे घनीभवन, सागराची निर्मिती, सेंद्रीय शृंखलांची घडण, वर वातावरणात वीज, पाऊस, किरण...

एकपेशी जीवांची उत्पत्ती, त्यांची उत्क्रांती, जमिनीवर वनस्पतींची उत्पत्ती, वाढ, प्राण्यांचं जमिनीवर आगमन...

मग पायऱ्यापायऱ्यांनी उत्क्रांती, रेप्टाईलचे युग...

मग ममालीयन एरा... माणूस आणि वानरे यांचे पूर्वज...

होमो नेंडरथाल; जाव्हा मॅन; पेकिंग मॅन...

होमो सॅपीन्स... मानव !

अग्नीचा शोध, चक्राचा शोध; लीव्हर, जलशक्ती...

खेडी, नगरे, शहरे, राजधान्या, राज्ये, साम्राज्ये... संस्कृती.

एकोणीसावे शतक. वीज. मॅग्नेटिझम, इलेक्ट्रॉनिक्स.

अवकाशातली पहिली चाचपडणारी पावलं. रॉकेटस्.

मग यांत्रिक उपग्रह... मग आंतरिक्ष प्रयोगशाळा.

मग मार्स शिप...वन. मंगळावरचा प्रवास.

मंगळावर आगमन. मंगळावरच्या मैदानात मी.

मेजर दिक्पाल आर्य. मंगळावरचा पहिला मानव.

युद्धाचे सर्व संदर्भ मी कटाक्षाने टाळले होते. आतापासूनच मानवी प्रतिमा कलंकीत कशाला करा ? पुढे त्यांना कळणारच आहे !

लक्ष एकाग्र ठेवणं फार फार कठीण गेलं. काही काही वेळा माझं मन विचलित झालं आणि चित्राच्या रेषा विरघळल्यासारख्या झाल्या; पण एकूण निर्मिती चांगली होती. अगदी मला स्वत:चा अभिमान वाटावा इतकी चांगली.

सुरुवातीपासून मी दोघांही किरकिटांकडे मधून मधून पाहत होतो. माझी ग्रहनिर्मिती चालू असताना ते समोर पाहत होते, आणि ते जरी काही बोलले नाहीत, तरी एकंदर उपपत्तीशी ते सहमत असावेत असा माझा ग्रह झाला होता.

मी पृथ्वीचं... तिसऱ्या ग्रहाचं... रेखन सुरू केलं आणि त्याच क्षणी त्यांच्यात एकाएकी एक बदल झाला. दोघंही एकदम विलक्षण स्तब्ध, अतिशय निश्चल झाले होते आणि समोरच आकार घेत असलेलं चित्र तन्मयतेने पाहत होते...

मी माझी चित्रमालिका संपवली व त्यांच्याकडे पाहिलं.

ते दोघंही दिग्मूढ होऊन समोर पाहत होते. त्यांना कशाचा तरी विलक्षण धक्का बसला होता हे उघड दिसत होतं...

'कि र्र्र्र...' एक म्हणत होता.

'कि र्र्र्र...' दुसरा त्याला उत्तर देत होता.

पॅनेलजवळच्या किरकिटने यंत्र बंद केलं, त्याच्या व माझ्या मस्तकावरचं शिरस्त्राण काढून खाली ठेवलं. मला दिसलं आणि जाणवलं की त्याचं सर्व शरीर थरथरत आहे...

दोघंही काही सेकंद माझ्याकडे पाहत उभे राहिले, आणि मग झपाट्याने दालनाबाहेर निघून गेले ! ते जर आश्चर्यचकित झाले असतील तर माझं आश्चर्य त्यांच्या दसपट होतं !

***

ते दोघे निघून गेले आणि मी त्या प्रयोगशाळेच्या दालनात एकटा राहिलो. ज्या प्रयोगासंबंधी माझ्या मनात खूप अपेक्षा होत्या त्याचा असा बोजवारा उडाला होता. माझ्या एकाही प्रश्नाचं उत्तर तर मला मिळालं नव्हतंच, उलट माझ्या माहितीचा त्यांच्यावरच काहीतरी विपरीत परिणाम झाला होता. माझं मन पुन्हा पुन्हा त्याच त्या एका घटनेकडे येत होतं. त्यांना असं घाईने जायला काय कारण घडलं ?

याचं कारण मी पुरवलेल्या माहितीत होतं, आणि तेही मी पृथ्वीचा, किंवा मानवाचा इतिहास रेखायला लागल्यावर घडलं होतं. त्यात त्यांना भिवविण्यासारखं किंवा धक्कादायक असं काय होतं ?

शेजारच्या ग्रहावर एक विचारी आणि प्रगत संस्कृती आहे हे कळल्याने ? पण मला तसं वाटत नव्हतं. बाहेरच्या विशाल विश्वाचं ज्ञान झाल्यावर मानव हा ईश्वराचा लाडका लेक आहे, सारी चराचर सृष्टी केवळ त्याच्या उपभोगासाठीच निर्माण झाली आहे ही भोळसट कल्पना पृथ्वीवरून नाहीशी झाली होती. जीवनाचं स्वरूप जसजसं अधिकाधिक स्पष्ट होऊ लागलं तसं मानवाचं पृथ्वीवर आगमन हा एखादा दैवी चमत्कार किंवा अपवाद नसून, जीवोत्पत्तीच्या साध्या नियमाचा तो एक आविष्कार आहे ही गोष्ट मानवाने स्वीकारली तेव्हा परग्रहावरचा एखादा प्राणी अवतरला

तर निदान शास्त्रज्ञांना त्यात भीतीदायक असं काही वाटणं शक्यच नाही. कारण ते या घटनेची अपेक्षाच करीत असणार.

त्यांना मानवी आक्रमणाची भीती वाटली असेल ? तेही मला पटेना. पृथ्वीवरच्या शास्त्राची आजची स्थिती मी त्यांना दाखवली होती. परग्रहावर स्वारी करण्याची मानवाची कुवतही नव्हती आणि हा वेडेपणा फक्त काल्पनिक कथातूनच होतो. त्यासाठी लागणारा पैसा, मनुष्यबळ आणि तयारी केवळ अतर्क्य आहे.

नाही. त्यांना एकदम अस्वस्थ करणारा घटक या सर्वांपेक्षाही मूलगामी होता, आणि तो माझ्यातच होता.

मी हजाराव्यांदा तरी ते ज्या दारातून गेले होते तिकडे पाहिले. ते दार उघडून त्यांच्या मागे जाण्याचा विचारही माझ्या मनात आला नाही. किरकिट जनतेविरुद्ध ते दोघं शास्त्रज्ञ एक कट रचीत होते, आणि इच्छा असो वा नसो, मीही त्यात सहभागी झालो होतो. माझ्या कोणत्याही कृतीने त्यांच्या कार्यात विघ्न यावं अशी माझी इच्छा नव्हती. याच कारणासाठी मी दालनातल्या कोणत्याही वस्तूला हात लावला नव्हता. त्याच त्या एका बंदिस्त जगात मी स्वत:ला कोंडून घेतलं होतं.

कंटाळून मी त्यांनी माझ्यासाठी तयार केलेल्या त्या दुधी रंगाच्या खुर्चीवर बसलो. हजाराव्यांदातरी मी ती खुर्ची बारकाईने पाहिली. पदार्थ टणक होता, त्यावर ओरखडा उठत नव्हता. वजनाला हलका होता, एका साच्यातून अखंड ओतल्यासारखा वाटत होता. मानसिक विचारांवर त्याचं असामान्य प्रभुत्व होतं ही गोष्ट मात्र खरी !

***

दोघं किरकिट परत आले तेव्हा कितीतरी तास उलटून गेल्यासारखं मला वाटत होतं. माझा धीर अगदी कसोटीला लागला होता, ते दोघं जरा बिचकतच खोलीत आले; मला खुर्चीवर बसलेला पाहून दोघंही जागच्या जागी खिळले, व मग सावकाश पुढे आले. मी हवेत विरघळून गेलो असेन अशी त्यांची अपेक्षा होती का काय ? काही सांगता येत नाही. कीटकाच्या चेहऱ्यावरचे भाव कसे वाचणार ?

मी उठलो, डोक्यावर शिरस्त्राण घालण्याचा आविर्भाव करीत त्या यंत्राकडे बोट दाखवलं. त्यांनी माझी सर्व हकीकत ऐकली (किंवा पाहिली) होती; आता मला त्यांची माहिती हवी होती, आणि त्यासाठी मी नैसर्गिकपणेच उत्सुक झालो होतो.

त्यांच्यापैकी एकाने (मला वाटतं जरा नाखुषीनेच) ते शिरस्त्राण मस्तकावर चढवलं, मीही त्याचं अनुकरण केलं, पण मी स्वत: काही हालचाल करायच्या आधीच त्याचे हात पॅनेलवर फिरले, समोरच्या दंडगोलात एक चित्रं आलं... त्यात एका दुधाळ खोलीत पाचसहा टोळ एकत्र उभे दाखवले होते, एकजण हातवारे करीत होता (एक लहान भागात मला दिसलं की प्रयोग शाळेतली घटना पुन्हा एकदा घडत आहे.) या दोघांपैकी कोणीतरी एक पहिल्या प्रयोगाची माहिती देत होता. याचा अर्थ प्रयोगात आणखीही काही बडे टोळ सामील होते तर !

पण त्यांची प्रतिक्रिया पाहण्यासारखी होती. त्यांचे मोठमोठे डोळे गरगर फिरले, चारी हातांची विलक्षण थरथर झाली, पाठीवरचे लहान, अभ्रकासारखे पंख फडफडले... त्यांचा विश्वास बसत नव्हता !

पण मला आता या टोलवाटोलवीचा जरासा राग यायला लागला होता. मला संधी मिळताच मी माझे प्रश्न (चित्राद्वारे) विचारले, सर्व मंगळावर ते एकटेच होते का ? आणखी जाती होत्या का ? त्यांच्या संस्कृतीचा इतिहास काय होता ? त्यांचं शास्त्र कोणत्या पातळीवर होतं ? त्यांची शासनव्यवस्था कोणत्या प्रकारची होती ? खरं म्हणजे अतिशय कठीण कल्पना... पण मी चिकाटी सोडली नाही.

मला ही माहिती मिळाली; पण पहिल्याच बैठकीत खास नाही. शब्दांनी संदेशन करता येत नव्हतं याची मला अनेकवेळा अडचण भासली. कारण चित्रं ही कल्पनांची संकेतरुपं असतात. त्यांच्यातून योग्य तो अर्थ दुसऱ्यापर्यंत पोहचेल अशी खात्री कधीच देता येत नाही.

पुनरावृत्ती टाळण्यासाठी माझी त्यांच्याविषयी अगदी शेवटची जी काय कल्पना झाली ती देत आहे. ती सर्वच्यासर्व बरोबर असणं शक्य नाही याची मला कल्पना आहे; पण तरीही...

विश्वनिर्मितीची त्यांची कल्पना कसल्यातरी वलयांवर आधारलेली

होती. मग ही वलये ऋण-कणांची होती की घन... कणांची होती की शुद्ध शक्ती कणांची होती का एखाद्या क्षेत्राच्या आवळत जाणाऱ्या विकर्ष रेषा होत्या हे मला शेवटपर्यंत उमगलं नाही. शक्ती... द्रव्य यांच्यातला परस्पर साधर्म्याचा गुण त्यांना फार पूर्वी कळला होता. विचारशक्तीचं स्वरूपही त्यांनी ओळखलं होतं. शक्ती... द्रव्य या वर्तुळात एक विचारी मेंदू हा दुवा किंवा रोहित्र आलं तेव्हा केवढी क्रांती झाली असेल याची कल्पनाच केलेली बरी ! हे दाखवत असतानाच (एकदा नाही, सुरुवातीस अनेक वेळा ) त्यांनी हा बंध मधेच तोडला आणि ते वंशशास्त्राकडे वळले.

त्यांच्या वंशाचा 'नोंदलेला' रेकॉर्डेड-इतिहास जवळजवळ चार हजार वर्षे मागे जात होता. वंशाच्या उत्पत्तीबद्दल त्यांच्या कल्पना इतक्या स्पष्ट नव्हत्या; पण एकूण इतिहासावरून त्यांचं अनुमान असं होतं की मध्यवृत्तावरच्या दलदलीच्या विभागात सुमारे लाख कथा आणि दंतकथा असं दाखवत होत्या की पूर्वी त्यांचाही आकार लहान होता, पण एकदा काहीतरी दैवी चमत्कार घडला व सर्व सृष्टीनियमांना डावलून त्यांच्यात एक जातीचा आकार जवळजवळ तीस पटींनी वाढला. त्यांच्या वंशाच्या इतिहासातला तो आवर्तन बिंदू होता. कीटकजगात तर त्यानंतर त्यांना कोणी शत्रूच उरला नाही आणि त्यांनी (आधी स्वत:च्या जन्मस्थानाची व मग सर्व ग्रहावरची) यच्चयावत् सर्व प्राणिजात नाहीशी करून टाकली. अगदी पुरातन इतिहास असं सांगत होता की त्यांना यशस्वी प्रतिकार करणारी एकच जात होती. ते प्राणी कृत्रिम व भक्कम बांधणीच्या वसतीगृहातून राहत असत. त्यांच्यापाशी अनेक विद्या होत्या... पण किरकिटाचं ज्ञानही वाढत होतं आणि त्यांची निपजही अवाढव्य होती. निसर्ग शेवटी या तरुण, नव्या जोमाच्या, वर्धिष्णू जातीच्याच सहाय्याला आला; ती जात नाहीशी झाली. किती वर्षांपूर्वी याची किरकिटांनाही कल्पना नव्हती. मग किरकिट मंगळग्रहाचे स्वामी बनले. (पुरातन कालचे काही अवशेष मला त्यांनी चित्ररुपाने दाखवले... माझ्या मनात एकाएकी प्रचंड पोलादी किल्ल्यांची कल्पना आली.)

त्यांच्या नगरांची रचना त्याने मला चित्ररूपाने आणि मग त्या टेलिव्हिजनसारख्या यंत्रावर प्रत्यक्ष दाखवली. बांधणीसाठी सर्वत्र तोच

एक प्लॅस्टिकसारखा पदार्थ वापरलेला दिसत होता. फिकट रंगाच्या भिंती... त्यातून जाणारे रस्ते आणि राजमार्ग... आणि सर्वत्र ते आठ... आठ, नऊ... नऊ फूटी लाल टोळ... किर्र र्र र्र... आवाज... मला वाटतं ते दृश्य प्रत्यक्ष पाहिल्यावर माझ्या परिस्थितीची खरी कल्पना मला आली. मैलोमैल पसरत गेलेलं वारूळ...

पण इतक्या वर्षांनंतरही त्यांची उत्पत्ती पूर्वीसारखीच होत होती. प्रत्येक वारुळाची राणी आता मातीच्या एका लहानशा खळग्यात बसण्याऐवजी एका अलिशान दालनात विसावली होती... पण काम तेच ते करीत होती. किंचित लालसर रंगाची, तीन इंच व्यासाची, चमकणारी अंडी एकामागून एक घालत होती... ते दृश्य पाहून मला काय वाटलं हे सांगताच येणार नाही...

त्याना पंख होते; पण त्या आश्चर्यकारक बदलानंतर त्याना पंख वापरणं येईनासे झाले. (वजन आणि पृष्ठभाग यांचा आकार एकासएक या प्रमाणात वाढून चालणार नव्हतं.) आता पंख केवळ शोभेसाठी राहिले होते आणि भावना दाखवण्यासाठी.

त्यांची वाहनव्यवस्था त्याने दाखवली. वाहनं ही त्याच त्या प्लॅस्टिकसारख्या पदार्थाची बनवलेली दिसत होती. हा पदार्थ अगदी सर्वव्यापी आहे. मला वाटतं. माझ्याजवळचा चाकू दाखवून मी त्याला तसे धातूचे पदार्थ त्यांच्याकडे का नाहीत याचं स्पष्टीकरण विचारलं. त्यांची कारणं दोन होती... एक धातूच्या खनिजाचा पुरवठा पुरेसा नव्हता, आणि दोन, धातू त्यांच्या त्या रचनायंत्रात वापरता येत नव्हते... मी त्यांचे ते यंत्र विसरलोच होतो ?

टेलिव्हिजनमधून पाहता पाहता एक जागा मला दिसली. माझी खात्री झाली की हा आंतरिक्ष प्रवासाचा तळ असला पाहिजे. माझ्या छातीत एक चमत्कारिक धडधड सुरू झाली... कारण एका उंच, पांढऱ्या, दुधाळ टॉवरशेजारी काही आकार होते...

काही उडत्या तबकड्या होत्या ! तोच तो वरचा अर्धगोलाकार डोम, त्याला सर्व बाजूंनी खिडक्या, त्याखाली एक पालथी, पसरट बशी, तिच्याखाली एक सपाट पृष्ठभाग... गॉड ?

मी पाहत असतानाच एक तबकडी जागची हलली, डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोच तिने हिरवट आकाशात झेप घेतली...

या वेगवेगळ्या वाहनांना शक्तीचा पुरवठा कसा होतो याबद्दल मी त्याला पुन्हा पुन्हा विचारलं; पण त्यातलं तत्त्व मला शेवटपर्यंत कळलं नाही. द्रव्यापासून शक्ती उत्पन्न होत होती, आणि त्यात सारथ्याचा काहीतरी भाग होता एवढं नक्की... पुन्हा ते वर्तुळ... द्रव्य... विचार... शक्ती (शरीरात संथ ज्वलनाने शक्ती निर्माण होतेच ना! मला वाटलं...) मला वाटत नाही तो माझ्यापासून मुद्दाम काही मागे ठेवीत होता. तो विषय व त्या कल्पना मला सगळं सर्वस्वी नवं व अनाकलनीय होतं...

दोघांनीही थकून मस्तकावरची शिरस्त्राणं काढून ठेवली.



हे सर्व मला एका बैठकीत समजलं नाही. पुढच्या काही बैठकींचा भाग त्यात घातला आहे; पण तरीही पहिली बैठक खूपच दीर्घ होती आणि मी अक्षरश: टेकीला आलो होतो. ते दोघं किरकिट गेले आणि मी थकून खुर्चीचा आधार घेतला. त्यांनी आताच मला दाखविलेला त्यांच्या वंशाचा समग्र इतिहास माझ्या मनात सारखा सारखा येत होता. मनात गोंधळ माजवायला त्यांची ती दुसऱ्या जातीशी लढाई, त्याची ती उडत्या तबकड्यासारखी आंतरिक्ष वाहने हीही सारखी येत होती... पण मी माझं मन प्रयासाने एकेका गोष्टीवरच एका वेळी केंद्रित करीत होतो.

त्यांची उत्पत्ती... किंवा त्यांच्या शरीरधर्मात झालेला अचानक व क्रांतिकारी बदल... हे उघड होतं की सुरुवातीस ते मंगळावरच्या इतर लाखो कीटक जातींपैकीच एक होते... एकाएकी त्यांची शरीरं बदलली, त्यांना विचारशक्ती आली... हा बदल कधी घडू शकेल ?

मनात एक फार फार जुनी आठवण वर येण्यासाठी धडपडत होती. मी हे किंवा असंच काहीतरी एखाद्या पुस्तकात किंवा सिनेमात किंवा टेलीशोमध्ये कोठेतरी पाहिलं होतं... साध्या प्राण्यात अचानक बदल...

एकदम तो शब्द माझ्यासमोर आला... किरणोत्सर्ग ?

१९४०-५० च्या काळात या प्रकारच्या कथांचा, सिनेमांचा अगदी

सुळसुळाट झाला होता. किरणोत्सर्गाने बदललेल्या, विकृत झालेल्या मुंग्या, मधमाशा, कोळी... मी आता त्यातलाच एक प्रकार पाहत होतो का ? पण किरणोत्सर्ग म्हणजे कृत्रिम रचना आली... आणि मग आणखी एक दुवा साखळीत योग्य जागी बसला... किरकिट म्हणत होते की त्यांच्याआधी येथे एक भरभराटलेली, सुधारलेली, शास्त्रयुक्त जात होती... ते तर मंगळावरचे आदिरहिवासी 'मानव' नसतील ? मी या तथाकथित 'मानवांचं' चित्रही पाहिलं नव्हतं, पण मनासमोर एक भयानक चित्र उभं राहिलं... बेफिकीरपणे प्रयोग करणारे मानव, एका आडबाजूच्या, निबिड अरण्यातल्या, दुर्गम दलदलीत होत असलेला क्रांतीकारी बदल... दोनसव्वादोन इंची, निर्बुद्ध कीटकांच्या ऐवजी सात... आठ... नऊ फुटी उंचीचे, सज्ञान, राक्षसी प्राणी... जेव्हा मानवांना जाग आली तेव्हा फार उशीर झाला होता... त्यांची कोणतीही शस्त्रे यांच्यापुढे टिकू शकली नव्हती... आणि शेवटी मानव नामशेष झाला होता... काहीहि निशाणी न ठेवता !

(कोण म्हणेल हे चित्र अतिशयोक्तीचे आहे ? प्रत्यक्ष आपल्या पृथ्वीवर वीसपंचवीस वर्षांपूर्वी हे प्रयोग असतच ना !)

त्यांच्या जरा वेगळ्या मानसिक शक्तीचंही स्पष्टीकरण हेच होतं का ? असलं तर मला आश्चर्य वाटलं नसतं... पण हे सगळे दुय्यम प्रश्न होते... जी गोष्ट मनाला सारखी टोचत होती ती ही होती...

मला हे टोळांचं... किरकिटांचं नगर... कधी अस्पष्ट, तर कधी स्पष्ट का दिसलं होतं ? सुरुवातीला त्यांच्यापैकी कोणालाही स्पर्श केला किंवा नुसता आवाज केला तरी ते एकदम गडप होत होते... त्यांचं नगरही गडप होत होतं... हा काय प्रकार होता ?

माझ्याभोवती आता पसरलेलं हे अवाढव्य शहर आजपर्यंत आमचे अनेक उपग्रह मंगळाला फेऱ्या मारून गेले, मंगळावरच्या पृष्ठभागाचे फोटो काढून गेले... त्यापैकी एकानेही या एवढ्या प्रचंड वस्तूची नोंद कशी केली नाही ? वस्ती आली की शक्तीचा उत्सर्ग आला... आपल्या नाजूक यंत्रावर त्याची नोंद का झाली नाही ?

मला वाटलं मी आता खऱ्या प्रश्नाकडे येत होतो...

मनात कोठेतरी दिवसांची मोजणी चालू होती. यानाबाहेर मी पंधरा दिवस (आपले ३६० तास) रहायचं असा कार्यक्रम होता. त्यापैकी आठ तर गेलेच होते. या आठ दिवसात मी काय मिळवलं होतं ? काहीतरी निश्चित हाती आल्याशिवाय मला या चमत्कारिक जागेतून हलणं शक्य नव्हतं. ते परवानगी देतील का नाही हाही प्रश्न होता. त्यांना नकळत जाणं म्हणजे एक कृतघ्नपणा ठरला असता आणि शिवाय बाहेरच्या रस्त्यावर आरडाओरडा करणारा टोळांचा तो जमाव मी विसरू शकत नव्हतो.

माझ्या अन्नपाण्याचा प्रश्न मामुली होता. माझं भोजन चालू असताना त्या दोन किरकिटांनी सर्व काही बारकाईने पाहिलं होतं, मग माझ्याजवळची अन्नाची एक वडी घेतली होती; त्यांच्या त्या प्रतिकृती यंत्राच्या प्लॅटफॉर्मवर ठेवली होती; आणि काही वेळातच यंत्रातून वड्याची मालिका बाहेर पडली होती; जे यंत्र मानसिक कल्पनांनुसार द्रव्याची बांधणी करू शकतं, त्याला पदार्थाचा एखादा नमुना प्रत्यक्ष दिल्यावर त्याचे रासायनिक विश्लेषण आणि कृत्रिम रासायनिक संकलन ही काय अवघड गोष्ट आहे ?

पाण्याचा तर प्रश्नच नव्हता.

मला टोचत होतं ते हे, की इतके दिवस येथे राहूनसुद्धा आम्ही एकमेकांना खरं ओळखतच नव्हतो. कधीकधी मला वाटे की ही चित्रलिपी अपुरी आहे; पण त्यांची ती 'क्रिर्र र्र र्र र्र...' ची भाषा तर माझ्या आवाक्या पलिकडची होती.

मी मनाशी ठरवलं की आता येणाऱ्या बैठकीत त्यांना माझे सरळ प्रश्न विचारायचे, आता हे अधांतरी ठेवायचं नाही... वेळ ! मी एवढंच म्हणतो की त्यावेळी मला कशाची कल्पना नव्हती !

✲✲✲

किरकिट खोलीत यायची मी वाटच पाहत होतो. (आताशी एक गोष्ट माझ्या ध्यानात आली होती... खोलीत प्रवेश केला की ते आधी माझ्याकडे पहायचे... मी तेथे असलेला पाहून त्यांना कसलंतरी नवल वाटायचं... पण आता अशा गूढ गोष्टी खूप झाल्या होत्या !)

तेव्हा ते दोघं आले. यंत्रापाशी यायलाही ते आताशी फारसे उत्सुक नसत... बहुतेकवेळा शिरस्त्राण मीच आधी पेहरत असे. आताही तसंच झालं. शेवटी त्यांच्यातला एक पुढे आला.

मी आता मनातलं सारं काही बाहेर येऊ दिलं.

पृथ्वीवरून आम्ही घेतलेले मंगळाचे फोटो... ओस, निर्जीव. मंगळाभोवती फेरी मारून यांत्रिक उपग्रहाने घेतलेले फोटो... पुन्हा उजाड, रखरखीत, निर्जीव, मंगळावर प्रत्यक्ष उतरून उपग्रहाने घेतलेले फोटो... पुन्हा तीच कथा. नंतर मला स्वत:ला आधी दिसलेलं मातट रंगाचं उजाड माळरान...

मग लांबवरून अर्धवट दिसलेलं नगर... रात्रीच्या वेळ दिसलेला झगझगाट... जवळ येताच दिसलेले लाल टोळ आणि इतर आकार... त्यांच्याजवळ येताच त्यांचं नाहीसं होणं... आणि मग मी केलेला पिस्तुलाचा वापर...

आणि मग प्रयोगशाळेतल्या यंत्राच्या प्लॅटफॉर्मवर मी !

या साऱ्याचा अर्थ काय आहे ? माझा प्रश्न उघड होता.

मी मागेच म्हटलं आहे की किटनच्या कचकडी चेहऱ्यावर कोणतेही भाव वाचता येत नाहीत; पण दोन किरकिटांची निश्चलता व पंखांची थरथर... त्यांना जर काही भावना असतील, तर त्यांचा आता क्षोभ झाला असला पाहिजे !

'किर्र र्र र्र...!' त्यांच्यातला एकजण म्हणाला.

'किर्र र्र र्र...!' दुसरा जरा वेळाने म्हणाला. काय संवाद !

आणि मग यंत्रात चित्रं यायला लागली.

कितीतरी वेळ चित्रं येत होती.

मी दिलं त्याच्या दामदुपटीने त्यांनी परत केलं होतं.

पाच मिनिटं... एक तास... वेळेचं मला भान राहिलं नाही.

समोरची चित्रं मेंदूच्या ठिकऱ्या उडवत होती. त्या जळत्या रेषात शहाणपणा जळून खाक होत होता. तेवढ्या वेळात माझं जगच नाही, माझं सारं विश्व उलटंपालटं झालं...



प्रथम मला वाटलं होतं की ते माझी थट्टाच करीत आहेत, मग मनात कल्पना आली होती की ही इतिहासाची पुनरावृत्तीच आहे; पण ते तेवढ्यावर थांबले नाहीत; तर्काच्या अघोरी शेवटापर्यंत ते गेले आणि माझं जग माझ्याभोवती कोसळत खाली आलं...

गजबजलेल्या किरकिट अवकाशतलावरून पांढऱ्या शुभ्र तबकड्या हवेत चढत होत्या, त्यांची ती शक्ती... मन... द्रव्य वलये वापरणारी अफाट गती अंतरिक्षाला सहज छेद देत होती...

त्या तबकड्या सूर्याकडे येत होत्या, सूर्याच्या तिसऱ्या ग्रहाकडे येत होत्या... माझ्या पृथ्वीकडे येत होत्या.

झूऽऽऽम्! तबकडी खाली आली.

मी मंगळावर आम्हाला काय दिसलं हे त्याला दाखवलं होतं... आणि तो पृथ्वीवर त्यांना काय दिसलं ते मला दाखवीत होता...

मी काय अपेक्षा केली होती ? कशाचीही असेल; पण त्याने दाखवलं त्याची तर खास नाही... नो ! नो ! ओ गॉड ? नो !

पृथ्वीचा अवाढव्य गोल जवळ आला... आकाशात पांढरे ढग होते... खाली सर्वत्र हिरवी गार वनराई होती... निळ्याशार समुद्राचा भूमीला वेढा पडला होता... पण ही माझी पृथ्वी नव्हती... मी जी पृथ्वी ओळखतो ती ही नव्हती... कारण त्या अजस्त्र, अफाट भूखंडावर मानवी संस्कृतीची एवढीशीसुद्धा खूण नव्हती !

कोठे होती आमची नगरे ! शहरे ! विशाल रस्ते ? विमानतळ ? लोहमार्ग ? गिरण्या ? कारखाने ? क्रीडांगणे...?

एका थंड वाऱ्याखाली झुलणारी हिरवीगार झाडं...

हे असं असेलच कसं ? माझं मन किंचाळून उठलं...

पोटात एक विचित्र संवेदना जाणवत होती... पोटात भीतीचा गोळा उठला होता... माझं शरीर थरथरत होतं...

'स्नॅप !' किरकिटने यंत्र बंद केलं व ते दोघंही थंड, अनाकलनीय नजरांनी माझ्याकडे पाहत राहिले. ज्या तिसऱ्या ग्रहावर प्रगत प्राणीसृष्टी नाही तेथून मी आलो आहे असं मी त्यांना सांगत होतो... आणि आता त्यांनी त्यांची माहिती माझ्यासमोर मांडली होती... नवल नाही ते गोंधळले

होते !

पण माझ्या तुलनेने त्यांची अवस्था काहीच नव्हती. त्यांचा केवळ एक शास्त्रीय अंदाज चुकला होता. माझं जग नष्ट झालं होतं ! पण मला लवकरच कळणार होतं की एवढ्यानेच माझी सुटका होणार नव्हती; माझ्या पुढे अजून काहीतरी भयानक होतं...

किरकिटने पुन्हा एकदा यंत्र सुरू केलं...

मी जरा बिचकतच दंडगोलात पाहिलं; पण यावेळी देखावा मंगळावरचाच होता. एका दुधाळ प्लॅस्टिकने मढवलेल्या खोलीत एक किरकिट त्याच्या ठराविक पवित्र्यात विश्रांती घेत होता. बराच वेळ काही झालं नाही आणि मग एकदम त्याची हालचाल सुरू झाली. एक प्रकारची अस्वस्थ, निरर्थक, असंबद्ध हालचाल... मला एकदम झोपेत अस्वस्थ झालेल्या माणसाची आठवण झाली, या टोळाच्या हालचालीवर अंदाज बांधायचा झाला तर त्याला एक अतिशय भयानक स्वप्न पडत असलं पाहिजे... (आणि तेही अशक्य नव्हतं, विचार-शक्ती आली की कल्पनाशक्ती आलीच, स्वप्नावस्था हे एक प्रकारचं बौद्धिक जीवनच असतं...)

चित्रात सकाळ झाली. सर्व रात्र बेचैनीत घालवलेला तो किरकिट एका प्रशस्त इमारतीत शिरताना दिसला. (हॉस्पिटल ? मनात शंका आली.) त्याचं वेगवेगळ्या अधिकाऱ्यांशी बोलणं झालं. त्याची तपासणी झाली. त्याला घरी पाठवण्यात आलं.

('कमी खा... लवकर झोप... मद्यपान कमी कर...' असला सल्ला दिला असावा... डॉक्टरही इथून तिथून सारखेच !)

पुन्हा एकदा रात्र, पुन्हा एकदा तोच अनुभव...

पुन्हा एकदा हॉस्पिटल. (की प्रयोगशाळा ?)

त्यांच्याकडे आता डॉक्टरांनी लक्ष द्यायचं ठरवलेलं दिसलं. त्याला एका विशिष्ठ दालनात आणण्यात आलं... (आणि याचक्षणी माझ्या छातीत धडधड सुरू झाली. कारण त्या खोलीतलं यंत्र मला ओळखू आलं... मी अशाच एका यंत्राच्या प्लॅटफॉर्मवर एकाएकी आलो होतो...)

त्या किरकिटला त्यांनी त्या यंत्रासमोर उभं केलं; ते त्याच्या

चकचकत्या डोक्यावर कसलं तरी शिरस्त्राण चढवीत होते आणि मग सर्वजण मागे सरले... सर्वजण कशाची तरी वाट पाहत होते...

आणि एकाएकी यंत्राच्या त्या प्लॅटफॉर्मवर एक आकार आला. त्याच्या रेषा बदलत होत्या; त्याचे पृष्ठभाग विरघळत होते; त्याची व्याख्या करता येत नव्हती; या किरकिटांच्या विलक्षण जगातसुद्धा तो बसू शकत नव्हता. तो एक भयानक आकार होता.

शास्त्रज्ञांनी किरकिटाच्या डोक्यावरचं शिरस्त्राण काढून घेतलं; पण तरीही यंत्राखालचा तो आकार नाहीसा झाला नाही. कोणते तरी अदृश्य शक्तीपाश त्याच्याभोवती आवळलेले असावेत.

सर्व प्रकाराचा अर्थ मला एका क्षणात समजला.

या एका किरकिटाला रात्री भयानक स्वप्नं पडत होती, त्यासाठी तो यांच्याकडे आला होता, मानसिक विचारांवर त्यांनी इतकं प्रभुत्व मिळवलं होतं की त्यांच्या यंत्राच्या सहाय्याने ते त्याच्या मनातली, स्वप्नात वावरणारी ती भयानक आकृतीही साकार करू शकत होते. आता ती त्यांच्या सत्यसृष्टीत आली होती, द्रव्यकणांनी बांधली गेली होती आणि त्यांची शस्त्रे तिच्यापर्यंत पोहचू शकत होती...

प्रखर किरणांचा एक झोत त्या अभद्र आकृतीवर पडला आणि ती पाहता पाहता विरघळून गेली.

शेवटचं चित्र एका शांतपणे विश्रांती घेणाऱ्या किरकिटाचं होतं.

त्याला झोपेत पडणारी स्वप्नं आता नाहीशी झाली होती !

***

**पण** एवढ्यानेही संपलं नाही. त्यांनी दुसरी चित्रमालिका सुरू केली. रात्रीची वेळ. शांत, निद्रिस्त नगर आणि एकाएकी हलकल्लोळ. पंधरावीस किरकिट एकत्र येऊन तावातावाने काहीतरी चर्चा करीत होते. त्यांच्या चर्चेचा आशय हा होता...

त्या सर्वांना विश्रांतीच्या वेळी स्वप्नात एक भयानक प्राणी दिसला होता आणि समोरच्या दंडगोलात माझं चित्र आलं ! मी केलेल्या सर्व कृती हुबेहूब दाखवल्या गेल्या. दोघांच्या मागून एकदम वर आलेला मी. रस्त्यात

एकदम आलेला मी. कसलेतरी आग ओकणारे शस्त्र हातात घेऊन त्यांच्यावर धावणारा मी.

चित्र बदललं. प्रयोगशाळा आली. ते सर्व किरकिट जमले होते आणि शास्त्रज्ञांनी यंत्र चालू केलं होतं. त्यांच्या मस्तकावर शिरस्त्राणं बसविण्याची तयारी चाललेली होती.

आणि तोच, एकाएकी, यंत्राच्या प्लॅटफॉर्मवर मी आलो !'

दालनात जमलेले किरकिट 'कि र्र र्र...!' आवाज करीत पळून गेले. शास्त्रज्ञ माझा नाश करण्यासाठी यंत्राजवळ आले.

आणि त्याचवेळी मी एका पांढऱ्या पदार्थावर काहीतरी आकृती काढून त्यांना दाखवली आणि माझा नाश तात्पुरता थांबला...

***

किरकिटांच्यात निदान समज तरी होती. या चित्रदर्शनाचा माझ्यावर झालेला परिणाम त्यांना दिसत होता. मला एकटं ठेवून ते दोघेही दालनाबाहेर निघून गेले.

माझ्यासमोर परस्पर विरुद्ध अशा हजारो गोष्टी होत्या.

त्यांच्यातून मला सत्य शोधून काढायचं होतं. त्यांच्यात तर्क आणायचा होता, त्यांच्यात अर्थ आणायचा होता...

मी पहिल्या श्रेणीचा गणिती किंवा तत्वज्ञ नसलो तरी बुद्धीने अगदी मंद नाही. ॲस्ट्रोपायलट होताना अनेक अवघड स्पर्धांतून जावं लागलं होतं आणि मंगळप्रवासासाठी प्रशिक्षण घेत असताना नेमका याच गोष्टीवर भर देण्यात आला होता. तेथले अनुभव असंबद्ध वाटतील, अविश्वसनीय वाटतील, कारण तुम्ही एका नव्या, परक्या व अमानवी ग्रहावर जात आहात. जोपर्यंत मानवी शास्त्रांचे नियम लागतील तोपर्यंत ते वापरा नाहीतर नवीन नियम तयार करा ! मानवी नियम सर्वकाळी व स्थळी खरे असतीलच ही खात्री बाळगू नका... तिथल्या वस्तूस्थितीला योग्य असे नियम बनवा. मानवी नियमांसाठी वस्तुस्थितीला विकृती देऊ नका.

मी पाहिलेल्या गोष्टी मनात आणत होतो, त्यांना कोणत्या तरी एका साच्यात बसवण्यासाठी झगडत होतो; पण हा झगडा सोपा नव्हता

आणि किरकिटांची मदत नसती तर मला यश आलंच असतं असं मी खात्रीने सांगू शकत नाही...

मी माझ्या पहिल्या अवस्थेत असताना मला हे किरकिट केव्हा दिसले ? हा माझ्या विचारांचा प्रारंभ बिंदू होता. सुरुवातीपासूनच एक विलक्षण, चमत्कारिक, अविश्वसनीय अशी एक कल्पना अस्पष्ट रुपात माझ्या मनात यायला लागली होती, ती कल्पना अशी होती.

किरकिटांची स्वप्न प्रक्षेपणे मला माझ्या नैसर्गिक अवस्थेत दिसत होती. या एका गृहितावर अनेक गोष्टीचा सहज उलगडा होत होता. त्या रात्री टेकडीवरून मला दिसलेलं प्रकाशित नगर हे खरं नगर नव्हतं, तर अनेक किरकिटांना त्यांच्या स्वप्नात दिसत असणारं त्यांचं नगर होतं. त्या सर्व अंशात्मक दृश्याचं संकलन होऊन मला तो संपूर्ण देखावा दिसला होता. मला दिसलेले किरकिट खरेखुरे किरकिट नव्हते, तर त्यांच्या स्वप्नातले प्रक्षेप होते. (न्यूयॉर्क, लंडन, मॉस्को, मुंबई अशा एखाद्या शहरातील लोकांच्या स्वप्नात बहुतांशी त्याच शहराचे देखावे येणार नाहीत का ?) हे लक्षात घ्या, की मी आता घटनांचा अर्थ समजून घेण्याचा प्रयत्न करीत होतो. त्या अशाच का घडतात हा विचार आता तरी माझ्या कक्षेबाहेरचा होता.

तर मग... या स्वप्नचित्रांची प्रतिक्रियाही समजू शकत होती. मी त्यांच्यापाशी गेलो आणि 'त्या' पातळीवर त्यांनाही मी दिसलो. स्वप्नात आलेल्या एखाद्या राक्षसासारखा ! ते किंचाळत जागे झाले, आणि माझ्यासमोरची स्वप्नाकृती फट्दिशी नाहीशी झाली ! हीच गोष्ट त्या रात्री अनेकवेळा झाली. नवल नाही अनेकांनी दुसऱ्या दिवशी 'स्वप्नात अक्राळविक्राळ राक्षस' आल्याची तक्रार केली !

'त्या' पातळीवर मी त्यांना पाहू शकत होतो, स्पर्श करू शकत होतो' त्यांचा 'कि र्र र्र... !' आवाज ऐकू शकत होतो... त्यांच्या स्वप्नात!

(हा विचार करताकरताच मला आणखी एक उलगडा झाला... मी टेकडीवरून खाली पाहत असताना सकाळच्या प्रकाशात मला त्यांच्या नगराचं एक धूसर, अस्पष्ट, भासवत वाटणारं दर्शन झालं होतं... तेही त्या सर्व किरकिटांच्या एकत्रित विचारांचं संकलित प्रतिबिंबच असलं पाहिजे!

प्रत्येकाच्या स्वतंत्र विचारांच्या मागे पार्श्वभूमीसारखा त्याच्या या नगराचा चित्रपट होता... रात्रीच्या स्वप्नांइतका हा प्रभावी नव्हता, एकेकाचं विचारचित्र मला दिसू शकत नव्हतं; पण सर्वांच्या विचारात जो एक समानभाग होता, तो मात्र मला दूरवरून जाणवला होता !

पण मी जवळ येताच तो देखावा नाहीसा का झाला याचं कारण मात्र मला कळत नव्हतं... कदाचित या विचारलहरींच्या प्रसाराचे नियम वेगळे असतील ! कोणी सांगावं ?)

त्यांची स्वप्नं नाहीशी झाली, मी अंधारात त्या माळरानावर एकटा होतो... आणि तेव्हाच मला त्या वेगवेगळ्या आणि विचित्र भावना जाणवल्या होत्या. मैदानात काठोकाठ भीती भरली होती. नगराची रात्र भीतीने लवलवत होती... आणि ती सर्वकष भीती संसर्गजन्य होती... माझ्याही मनाला तिचा जहरी स्पर्श झाला होता !

***

तेव्हा ते सर्व भ्यायलेले किरकिट या प्रयोगशाळेत-दवाखान्यात-हॉस्पिटलमध्ये, काहीहि म्हणा... आले. त्यानी पूर्वी या 'केसेस' हाताळल्या होत्या, पूर्ण बऱ्याही केल्या होत्या. त्या शिरस्त्राणाखाली बसल्यावर ते भीतीग्रस्त किरकिटाला मोहिनीत नेत असावेत. त्याला त्याचं ते भयानक स्वप्न सूचित करीत असावेत, मनात विचार यायला लागले की त्यांची घन प्रतिकृती समोर तयार होत होती आणि मग ते शिरस्त्राण काढल्यावरही ती आकृती ते तशीच ठेवू शकत होते ! आणि 'रोग्या'समोर त्याचा नाश करू शकत होते ! एवढा पुरावा दिसल्यावर तो 'बरा' होऊन परत जायचा.

तेव्हा हे भ्यालेले किरकिट येथे जमले. (आणि त्याच वेळी मी मैदानात हिंडत होतो.) त्यांनी यंत्र सुरू केले. शक्तीपाश सर्वत्र पसरले. किरकिटांच्या मस्तकावर शिरस्त्राणे चढली की या शक्तिपाशांना काही विवक्षित हेतू येणार होता... ते त्या स्वप्नाकृती घडविणार होते, पण त्या आधीच काहीतरी विलक्षण घडलं !

त्यांच्या स्वप्न पातळीवरचा मी मैदानात वावरत होतो. ते पाश माझ्याभोवती पडले. मला वाटलं होतं की मी इकडेतिकडे पळत आहे;

पण खरी गोष्ट तशी नव्हती. मला काही ठराविक दिशाच मोकळ्या होत्या. (कागदावरची पाऱ्याची गोळी कागद खालीवर करून जशी हव्या त्या ठिकाणी आणता येते तसंच !) काही ठराविक 'उतारच' मला मोकळे होते. त्यावरून घसरत घसरत मी यंत्राच्या मध्यभागी आलो होतो... आणि संक्रमण झालं ! (हा क्षण, हा बिंदू, हा बदल मला सर्वांत भयानक वाटतो. खरोखर झालं तरी काय ? यावर विचार करून माझं डोकं फुटायची वेळ आली आहे, पण व्यर्थ !

किरकिट शास्त्रज्ञसुद्धा स्तंभित झाले तर त्यात काय आश्चर्य ! त्यांनी जाळं लावायच्या आधीच त्यात एक मासा सापडला होता ! अनाहूत! अनिमंत्रित ! ते लाल टोळ, सॉरी, किरकिट, किंचाळले ते स्वाभाविकच ! त्यांच्याच स्वप्नातला भयानक आकार आपण होऊन त्यांच्यासमोर आला होता ! (आणि दवाखान्याबाहेर रोज निदर्शने चालली होती तीही नैसर्गिकच होती... त्या राक्षसाला ठार करा ! नाहीसं करा !)

शास्त्रज्ञ इतके भावनाधीन झाले नव्हते. त्यांनी मला संधी दिली होती. कारण एक गोष्ट त्यांनी ओळखली होती... त्यांच्या स्वप्नाच्या पातळीवर मी असलो तरी माझं अस्तीत्व स्वतंत्र होतं... त्यांच्या यंत्राने त्यांच्या शक्ती... विचार... द्रव्य वलयाने मी तयार झालो नव्हतो...

त्यांनी मला एक संधी दिली...

आणि हे एवढं लिहायला मी जिवंत राहिलो...

***

पण माझा विचार एवढ्यावरच थांबत नव्हता. तो त्याच्या तर्कशुद्ध शेवटापर्यंत न्यावाच लागणार होता. (येथे मला किरकिट शास्त्रज्ञाची बरीचशी मदत झाली.)

आतापर्यंत एक गोष्ट स्पष्ट झाली होती. मानव व किरकिट हे वेगळ्या पातळ्यांवरचे प्राणी होते. किरकिटांची स्वप्नं मानवांना दिसू शकत होती. (माझी किरकिटांना दिसली नव्हती... आमच्या अनेक प्रयोगातला हाही एक प्रयोग होताच. याचा अर्थ ही जाणीव एकमार्गी होती.)

आता आमच्यापैकी खरं कोण होतं ? मला त्यांचं नगर दिसलं

नव्हतं. जाणवलं नव्हतं, मी त्यातून आरपार गेलो होतो. माझं यान जवळच उतरलं होतं; त्याची ज्वाला त्यांना दिसली नव्हती, त्याची शॉकवेव्ह त्यांना जाणवली नव्हती; मी सांगितलेल्या ठिकाणी ते जाऊन आले होते; पण तेथे त्यांना माझं यानही दिसलं नव्हतं ! 'आणि आताच्या माझ्या अवस्थेत मलाही ते दिसणार नाही,' असं ते म्हणत होते !

या एका महत्त्वाच्या विचाराभोवती अनेक उपविचार फिरत होते. त्यांनी त्यांची अवकाशयानं... तबकड्या ! ... मला दाखवल्या होत्या. या यानातून त्यांनी पृथ्वीला अनेकवेळा भेटी दिल्या होत्या... मग मानवाला ते दिसले कसे नव्हते...? का दिसले होते ?

उडत्या तबकड्यांवर जगातल्या अनेक शास्त्रज्ञांनी संशोधन केलं होतं. त्यापैकी काही काही महत्त्वाची प्रकरणं मला आठवत होती. अगदी विश्वासार्ह अशी उदाहरणे मोजकीच होती... सर्वांत एक समान होतं... उडत्या तबकड्यांचा प्रकाशमय आकार, त्यांचे बदलते रंग, आणि जवळ जाताच अचानक नाहीसं होणं !

एक विलक्षण विचार मनात येत होता... किरकिटांना स्वप्न पडलं तेव्हा त्यांच्या स्वप्नात मला ते आणि त्यांचं नगर दिसलं... आणि मी जवळ जाताच ते नाहीसं झालं... समजा, समजा... तबकडीवरील अनेक अधिकाऱ्यांपैकी एखादा विश्रांती घेत असेल, त्याला जर स्वप्न पडलं (वाटतं इतकी अशक्य गोष्ट नाही... मला स्वत:ला यानात हा अनुभव आलेला आहे !) तर... त्याच्या स्वप्नाच्या तबकडीचा आकार मानवांना दिसेल ! आणि त्या स्थितीत त्यालाही मानवी निर्मिती दिसेल ! (पण ती तो स्वप्नातली व खोटीच समजणार !) पाठलागावर कोणी आलंच तर 'त्याला' ते जाणवेल. तो एकदम जागा होईल !

क्षणभर दिसलेली तबकडी एकदम नाहीशी होईल !

(हा विचार येताच नाडी एकदम वेगात धावायला लागली होती. या वेगळ्या पातळीवरील अस्तित्वाचाच हा एक अप्रत्यक्ष पुरावा होता ! आणि कितीतरी जुना ! मी जन्मायच्याही आधीचा !)

हे व असे अनेक विचार चाललेले असताना मनात कोठेतरी एक खोल भयानक काळीकभिन्न दरी उलगडत होती. कणाकणाने माझ्या सर्व विरोधाला न जुमानता मन तिकडे खेचलं जात होतं... केव्हा ना केव्हा तरी मला या प्रश्नाचं उत्तर द्यावं लागणारच होतं... फक्त मी ते लांबणीवर टाकत होतो, इतकंच !

तुमच्या लक्षात ते आलंच असेल.

प्रश्न हा होता. त्यांनी आपले ते यंत्र उत्तेजित केले होते; पण त्यात कोणताही साचा घातला नव्हता. स्वप्न पडलेल्या किरकिटांच्या मस्तकावर शिरस्त्राणं चढवायची होती. स्वप्न द्रव्य शोधणाऱ्या त्या लहरी केवळ आसमंतावरून फिरत होत्या. त्यांच्या जाळ्यात मी कसा सापडलो ? स्वप्नद्रव्याचे क्षेपण करून ते साध्या पातळीवर आणणे एवढं एकच एक काम त्या लहरींना होतं... पण त्यांच्या क्षेत्रात जेव्हा एखाद्या किरकिटाची स्वप्नकृती मुक्त होत असे तेव्हा ते ती आकृती पाशबद्ध करून 'गोठवत' असत... पण यावेळी कोणीच त्या (माझ्या) आकृतीचा प्रक्षेप करीत नव्हतं... तरीही मी त्या क्षेत्रात सापडलो होतो, आणि एका नव्या पातळीत 'गोठवलो' गेलो होतो...

या सर्वांचा एकच एक भयानक निष्कर्ष होता...

मी आधीच त्या, स्वप्नांच्या, पातळीवर होतो...

कितीही खटपट केली तरी या एका निष्कर्षाला मला डावलता येईना. हा साधा अडथळा नव्हता, ही माझ्या उरावरची धोंड होती. ही एक आणि एकच वस्तुस्थिती मी, आणि माझ्यामागे उभी असलेली मानवी संस्कृती या सर्वांना एकाच फटकाऱ्यात नामशेष करून टाकत होती !

असं समजू नका की मी हा निष्कर्ष सहसासहजी घेतला. नो ! नो! मी किती झगडलो ! ओ गॉड्‌ मी तासच्यातास झगडत होतो ! पण त्यातून सुटकेचा मार्गच नव्हता...

मला वाटलं होतं की मानवांच्या बाबतीत या विरुद्ध घडत असेल. मानव जर त्यांच्या स्वप्नांच्या पातळीवर असेल, तर किरकिट आमच्या स्वप्नांच्या पातळीवर असतील ! मग सर्व काही सुसह्य झालं असतं... पण तसं नव्हतं ! मला रात्री त्यांचं नगर दिसलं होतं; पण त्यांनी पृथ्वीवर कितीतरी

सफरी केल्या होत्या... त्यांना मानवाच्या अस्तित्वाची पुसटशी शंकाही आली नव्हती ! मानवासारखा स्वप्नाळू प्राणी नाही... पण ते त्यांच्यापर्यंत पोहचतच नव्हतं... कारण ते वेगळ्याच पातळीवर होतं ! त्यांना पृथ्वी निर्जीव, केवळ झाडाझुडपांना फुलून गेलेली दिसली होती ! मग मानव होता तरी कुठे !

***

त्या एकदोन रात्री मला अगदी काळरात्रीसारख्या वाटल्या. हा निष्कर्ष अटळ होता, अपरिहार्य होता... आणि माझं मन एका विलक्षण निराशेच्या, विफलतेच्या पटलाखाली अंधारून गेलं...

मनासमोर एक जळता प्रश्न उभा राहिला होता...

मानवाचं स्थान आहे तरी कोणतं ? त्याचा हा दीर्घ इतिहास, त्याची कोट्यावधी वर्षातून कणाकणाने घडत आलेली उत्क्रांती, त्याची संस्कृती, त्याची शास्त्रीय प्रगती, त्याचा अवकाश दिग्वीजय... या साऱ्याचा अर्थ तरी काय लावायचा ?

माझ्या अल्पमतीला हा प्रश्नांचा भार असह्य होत होता. ते दोन किरकिट शास्त्रज्ञही मला काही मदत करू शकले नाहीत. त्यांच्याशी मी यावर चर्चा केली नाही असं नाही... आमच्यातले संबंध आता अगदी बरोबरीचे व जिव्हाळ्याचे (एक स्वप्नमानव व दोन कीटक यांच्या संबंधात हा शब्द योग्य असेल तर !) झाले होते. हे उघड होतं की माझ्याबद्दल त्यांना सहानुभूती वाटत होती. ते एवढंही म्हणाले (जरी आम्ही त्याच त्या चित्रभाषेत बोलत होतो तरी संभाषणात आता सफाई व सार्थता आली होती.)

'आम्ही हवं तर तिसऱ्या ग्रहावर एक क्षेपणकेंद्र उभारू... व त्यात तुझ्यासारखे आणखी 'मानव' उतरतात का ते पाहू...'

पण त्याचा काय उपयोग होणार होता ? माझ्याच मनातली शंका खरी ठरली असती... आणि मग मला समजलं... मी त्या प्रश्नाचं उत्तर शोधत नव्हतो, मला ती शंका निराधार ठरवायची होती, तिचं खंडण करायचं होतं.

त्यांची शरीररचना, त्यांची समाजव्यवस्था; त्यांची शासनसंस्था,

त्यांची शास्त्रे यावर मी आजपर्यंत असंख्य टिपणे करून घेतली होती. एक जाडजूड ग्रंथ होईल इतकी; पण मी ती आता नष्ट करून टाकली, जे जगच मानवाला अदृश्य, अस्पर्श, अनाकलनीय, असत्, आहे, त्याची ही खुलासेवार माहिती हवी कशाला ? पण त्यामागचं खरं कारण वेगळं होतं... अस्तित्वालाच धोका निर्माण झाला तेव्हा ही शास्त्रीय जिज्ञासा पार गोठून गेली होती ! ही तर माझी संशोधकाची स्थितप्रज्ञता !

किरकिटांच्या जगातला एकएक दिवस माझ्यावरचा बोजा वाढवीत होता. किरकिट शास्त्रज्ञांच्याही लक्षात ही गोष्ट आली होती. माझ्या मनात एक शेवटची अंधुक आशा होती.

'मला तुम्ही एकदा बाहेर न्या.' मी त्यांना सुचवलं. 'ज्या ठिकाणी मी माझं यान उतरवलं आहे तेथे न्या...'

माझ्या मनात काय होतं हे त्यांच्या ध्यानात आलं व त्यांनी याला संमती दिली.

आमच्या एकाच एका प्रवासासाठी आम्ही मंगळावरची एक शांत रात्र निवडली. मी त्या दालनातून प्रथमच बाहेर पडत होतो. त्यांनी मला खाली, रस्त्याकडे नेलं नाही... वर, छपराकडे नेलं. तेथे (त्याच त्या दुधाळ प्लॅस्टिकचं) एक लहानसं वाहन होतं. गोलाकार, एका छोट्या तबकडीसारखं. आत सहाजणांसाठी जागा होती. (पण बसायला आसनं नव्हती... ती त्यांना कधीच लागत नसत.)

वाऱ्यावर उडणाऱ्या पिसासारखी तबकडी अलगद हवेत चढली. वर मंगळाचे हिरवट आकाश होतं. खाली किरकिटांचं प्रकाशित नगर होतं. रस्त्यावरून तुरळक रहदारी चालली होती... कामधंदा, गंमतजमत उरकून घराकडे परतणारे किरकिट...

मी सांगितलं त्या ठिकाणी त्यांनी तबकडी खाली आणली.

माझ्या अंदाजाप्रमाणे या जागेच्या आसपास एम्. एस्. वन उतरलं होतं. त्याचा ऐंशी फूट उंचीचा आकार लपण्यासारखा नव्हता...

पण माझी भांबावलेली नजर दाही दिशांना वळली तरी मला एम्. एस्. वन ची सोनेरी सुई दिसली नाही.

त्या मैदानावर मी माझ्या आयुष्यातले सर्वात वाईट क्षण घालवले.

त्याच त्याच जागेवरून मी वेड्यासारखा चकरा मारीत होतो, आणि प्रत्येक क्षणाला मन निराशेच्या खोल गर्तेत आणखी खोल रुतत होतं... माझं सर्व आयुष्य, माझ्या श्रद्धा, माझ्या आशा, माझे आनंद, सर्व काही माझ्याभोवती एखाद्या पत्त्याच्या घरासारखं कोसळत होतं...

मी परत तबकडीत शिरलो तेव्हा माझ्या मनाचा चक्काचूर झाला होता. पुन्हा भ्रमनिरास झाला होता. सर्व अर्थ संपला होता.

***

त्या रात्री आमची शेवटची बैठक झाली.

'तुम्ही याचा काय अर्थ लावता ?' मी शेवटी त्यांना विचारलं.

ते काही वेळ गप्प बसले. (जरा अवघडल्यासारखे !)

'आम्ही सांगतो ते तुला आवडणार नाही.' ते शेवटी म्हणाले. त्यांची चित्रं सहानुभूतीच्या गुलाबी रंगात उमटत होती. 'शेवटी ते शास्त्रीय सत्य आहे, जे प्रयोगांच्या निकषांना उतरते, तेच मान्य केलं पाहिजे. तुलासुद्धा हे कबूल करावंच लागेल.'

'तुमची घडण स्वप्नद्रव्याची आहे. याचा एकच अर्थ आहे. तुम्ही कोणत्यातरी स्वप्नातले प्राणी आहात !'

हा शेवटचा टोला होता. आता जर काही शाबूत असेल तर ते या टोल्याखाली चुरमडून गेलं, त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या...

'शेवटी तुम्हाला स्वत:लाही हा प्रश्न विचारलाच पाहिजे, नाही का ? ते शांतपणे म्हणत होते. 'आणि त्याचं उत्तर सोपं नाही. असं उदाहरण आम्ही पाहिले नाही... स्वप्नावस्थांचा आमचा अभ्यास अत्यंत सखोल आहे... तरीही स्वप्ननिर्मितीच्या मनोव्यापाराचा अभ्यास आम्हाला अशक्य ठरला आहे... ती... ती कक्षाच वेगळी आहे...

मी काहीच बोललो नाही... काय बोलणार ?

त्यांना मला आणखी काहीतरी सांगायचं होतं.

'आणि हे पहा, शेवटी कोणताही सजीव प्राणी बाह्यसृष्टीच्या प्रत्यक्ष स्पर्शक्षेत्रात कधीही येत नाही. त्याचं सर्व ज्ञान अप्रत्यक्षरित्या मिळवलेलं असतं. त्यावरून तो सृष्टीचे काही नियम तयार करतो. तुम्हीही

(!) तेच केलेलं आहे; पण तुमचा बाह्यसृष्टीशी संबंध जरा वेगळा आहे. दुरावलेला आहे... या तुमच्या नियमांची कसून तपासणी करा... त्यात कोठे काही विसंगती आढळते का ते पहा... काही घटना स्पष्टीकरणापलिकडच्या आहेत का ते पहा. याच तुमच्या भोवतीच्या आवरणातल्या फटी आहेत... हे जोडाचे सांधे आहेत... जेथे रेषा किंचित वक्र होतात, एक संपाती होत नाहीत, दिलेले नियम पाळले नाहीत, या विसंगतीचा अभ्यास करा... सर्व कठीण आहे व सर्व कटू आहे, हे आम्हीही जाणतो... पण यापेक्षा आम्ही जास्त काय सांगणार ?'

एका भ्रमचित्राला, एका स्वप्नाकृतीला ते आधार देत होते !

'आम्हाला वाटतं की तू आता आपल्या पातळीवर जावंस...' ते शेवटी म्हणाले, 'तुझ्या इतर बांधवांना हे सत्य सांगायचं की नाही याची जबाबदारी तुझ्यावरच आहे... पण त्यांना नकळत ते मंगळावर आले तर... तर... त्यांना काही विचित्र अनुभव येतील...

मी त्याची कल्पना करू शकत होतो.

'मला बरोबर न्यायला काहीतरी द्या...' मी शेवटी म्हणालो.

त्यानी एक छोटे प्रतिकृतीयंत्र माझ्या हातात ठेवलं. त्यात एक इंचापर्यंत आकृति तयार होऊ शकत होत्या. मी त्यांचे आभार मानले. काही झालं तरी ते माझे आजन्म मित्र बनले होते.

आणि मी यंत्राच्या प्लॅटफॉर्मवर चढलो.

किरकिटांनी चारी हात व पंख उंचावून मला अभिवादन केले व मग त्याचा हात पॅनेलकडे गेला.

***

त्या संक्रमणाच्या क्षणी मला काय वाटलं ते शब्दात वर्णन करून सांगताच येत नाही. डोळ्यांसमोरची ती प्रकाशित प्रयोगशाळा एकदम भिरभिरत दूर दूर गेली, दिसेनाशी झाली... जणु काही चेहऱ्यावर एक प्रकाशित, चित्रांकित वस्त्र टाकलं होतं, ते कोणीतरी काढून घेतलं. पाण्यातून एकदम वर यावं व आसपासचं जग बदलावं, तसं वाटलं. किंवा... जाऊ द्या ! उपमा हजार आहेत, सार्थ अशी एकही नाही...

हा उत्पाती बदल माझ्या आसपास झाला एवढं खरं...

एखाद्या प्रचंड लाटेसारखा तो माझ्यावरून गेला...

लाटेमागे राहिलेल्या खडकासारखा मी मागे राहिलो...

मी त्या मोकळ्या मैदानात होतो. आसपास काहीहि नव्हतं. खाली रेताड जमीन होती. (हेच आमचं मंगळाचं चित्र होतं ?)

समोर दोन एक मैलांवर एम्. एस्. वनची सुई तळपत होती.

वर क्षीण सूर्य होता, हिरवट आकाश होतं, असंख्य तारे होते...

त्या जीवघेण्या अनुभवांतून मी सहीसलामत वाचलो होतो.

शरीर व मेंदू दोन्ही ताळ्यावर होते. शाबूत होते.

आणि एकाएकी भीतीने माझे सर्वांग शहारून उठले.

कारण मी छातीशी धरलेले हात रिकामे होते.

त्यांनी दिलेलं ते लहान प्रतिकृतीयंत्र... ते यांच्या जगाबरोबर हवेत विरघळून गेलं होतं... माझ्या हाती काहिही नव्हतं !

***

मंगळावर माझ्यासाठी आता काहीहि नव्हतं. समोरची ती सुई मला बोलावत होती. तिकडे माझे पाय अपरिहार्यपणे वळले.

मनात एक खूप जुनी आठवण आली... बाहेर पंधरा दिवसच रहायची आज्ञा होती व तेवढीच सोय होती... वास्तविक मी कितीतरी दिवस बाहेर काढले होते... (मागून कळलं... एकेचाळीस दिवस !)

त्यांना काय वाटलं असेल ! त्यांनी माझ्या परतीची आशा सोडून दिली असेल का ? मला काहीच विचार करता येत नव्हता. त्या सुईकडे व तेथून मंगळतळावर... मला एकच मार्ग खुला होता.

पूर्वीचं आयुष्य निरर्थक झालं होतं; पण तेच एक आयुष्य मला माहीत होतं. (काय चमत्कारिक विचार ! याचा अर्थ काय ?) शरीराला व मनाला इतका विलक्षण थकवा आला असेल याची मला कल्पना नव्हती. एकेक पाऊल म्हणजे यमयातना वाटत होत्या... सुईपर्यंतचं ते अंतर कधी संपणारच नाही, मला वाटायला लागलं.

मार्स शिप जवळ आलं, मोठं झालं... त्याच्या अंगाला व्हाल्व्ह

होता. मला जरासा विचार करूनच तो उघडावा लागला... मग लहान पायऱ्या. पुढच्या सर्व क्रियांची असंख्य वेळा चाचणी झाली होती, त्यांच्यात एक प्रकारचा प्रतिक्षिप्तपणा आला होता, म्हणूनच माझ्या हातून त्या ओळीने झाल्या... व्हाल्व्ह बंद, एअरव्हाल्व्ह सुरू, स्पेससूट खाली...

पण आसपासच्या गोष्टीवरून मन सारखं घसरत होतं.

हे खरं नाही ! मनात खोल कोठेतरी एक टोचणी होती... हे सर्व खोटं आहे, मिथ्या आहे, भ्रामक आहे. स्वप्न आहे... मी, माझं मन, माझं शरीर, हे यान, ही उपकरणं, हा प्रवास... सारं काही लुटुपुटीचं आहे... मनात विचारांचा भडका उडाला होता. मन ताळ्यावर आणणं फार फार कठीण जात होतं...

शिपमध्ये एकदम एक आवाज उमटला. मी किती दचकलो !

मनाची विचारचक्रं गंजली होती, अडकून पडली होती... त्यांना लवकर गतीच येईना... हा आवाज ओळखीचा आहे, हे शब्द माझ्या परिचयाचे आहेत, मला सारखं वाटत होतं...

मग कितीतरी वेळाने आठवलं... मंगळतळ २ चा संदेश !

ओहो ! त्या साऱ्यांचा या नाटकावर विश्वास होता तर ! पण हा त्यांच्यावर अन्याय होता... त्यांना काही माहीत नव्हतं...

मी सावकाश टेलिव्हीजनकडे वळलो...

एकेचाळीस दिवसांनी परत आलेला मी... त्यांना कशाचीच खात्री वाटत नव्हती. मी शुद्धीवर आहे का नाही याचीही त्यांना शंका होती... पण मी त्यांच्याजागी असतो तर ? हेच केलं असतं !

नसताना जुन्या सवयी होत्या. त्या मार्गाने विचार वाहायला लागले. फ्लाईट शेड्यूल, टेक ऑफ टाइम, ऑटोपायलट... शेवटी माझ्यावर एक किमान जबाबदारी होती. माझं मत काहीहि असो... मी त्यांच्या कार्याचा विध्वंस करू शकत नव्हतो ! त्यांचं यान त्यांच्यापर्यंत सुखरूप न्यायलाच हवं ! मग पुढचं पुढे...!



पण त्यांचा टेलीकॅमेरा मला सलत होता. ती एकटक नजर मला

असह्य होत होती. तो बंद करण्याची माझी त्यांच्याकडे पहिली (आणि शेवटची !) मागणी होती... ती त्यांनी मान्य केली.

मी यानात एकटा राहिलो. खऱ्या अर्थाने एकटा. आता ते आपल्या गतीने बरोबर मंगळतळावर जाऊन पोहोचेल... त्यांच्या हाती सुखरूप पोहचेल ! दिक्पाल आर्य या नावाने मिरवणाऱ्या एका मानवी देहाची जबाबदारी माझी होती, त्यांची नव्हती...

पहिले एकदोन दिवस मला वाटतं मी पुरा शुद्धीवरच नव्हतो. सर्व कार्यक्रम यांत्रिक सवयीने होत होते. डोक्यात एक बधीर, सुन्नपणा आला होता. वैफल्याचा असह्य बोजा उरावर होता; पण मग मनात सावकाश सावकाश विचार यायला लागले. मला हे जे नवे ज्ञान मिळालं आहे, ते मी माझ्यापाशीच ठेवलं तर त्याचा उपयोग काय ? ते इतरांना समजलं पाहिजे, त्यांचा भ्रमनिरास झाला पाहिजे... माझ्या डोळ्यांसमोर एक चित्र आलं... मी ही हकीकत कोणाला तोंडी सांगायला गेलो, तर त्याची काय प्रतिक्रिया होईल याची मला कल्पना होती...

नाही, तो मार्ग चुकीचा होता.

मग काय करायला हवं ते मला समजलं. माझा आताच्या क्षणापर्यंतचा सर्वच्या सर्व अनुभवांचा इतिहास संगतवार, खुलासेवार लिहून ठेवला पाहिजे आणि तो एखाद्या विश्वासू माणसाच्या हवाली केला पाहिजे. एक नाव एकदम डोळ्यांसमोर आलं... श्रीहरी मायदेव-गुड ओल्ड श्री ! नशीबाने तो मंगळतळावर आहेच... त्याच्या हाती हे पडेल अशी व्यवस्था केली पाहिजे...

गेले दहाबारा दिवस मी हे सर्व लिहीत आहे. एक एक प्रसंग, जसा घडला तसा, लिहीत आलेलो आहे. पृथ्वीवरून बाहेर जाताना मनात जी एक ईर्ष्या होती, जो उन्माद होता तो आता पार हरपला आहे. आता मी एक निसत्व, निरर्थक असे भासचित्र आहे...

***

अजून माझ्यापुढे कितीतरी दिवस आहेत. माझ्यासमोरचं मुख्य कार्य संपलं आहे. घटना जशा घडल्य, तशा त्या वर्णन केल्या आहेत; पण

त्यांच्यावर विचार करण्याचे स्वातंत्र्य तर मला आहे ना ?

'तुमच्या मूलभूत नियमांची फेरतपासणी करा...' किरकिट मला म्हणाले होते, 'त्यात विसंगती दिसतात का पहा...'

ठीक आहे तर. मी काही मोठा थिअॉरॉटिकल फिजिसिस्ट किंवा गणिती नाही; पण मी शास्त्राचा अभ्यास केलेला आहे. मनात येतात ते विचार मांडून ठेवायला काय हरकत आहे ?

आणि मी जसजसा एकेका शास्त्रशाखेचा विचार करू लागलो; त्या शास्त्राच्या पायाकडे, मूलभूत सिद्धांताकडे, मूल हितांकडे यायला लागलो, तसतसं मला आठवायला लागलं की विसंगती शिवाय शास्त्रच नाही, हे विचार आजवर अनेकांनी मांडलेले आहेत, पण ते मी आता एका फार फार वेगळ्या संदर्भात मांडत आहे...

प्रकाशाचा वेग घ्या. सेकंदाला एक लाख शहाऐंशी हजार मैल. अविकारी. निसर्गातला एक स्थिरांक. यापेक्षा मोठा वेग असूच शकत नाही. वेगाची अंतिम मर्यादा; पण का ? याला काही कारण आहे का ? 'स्थल. काल. पटाचा विशिष्ट गुणधर्म' एवढ्यानेच याचं स्पष्टीकरण होतं का ? यापेक्षा आपण असं म्हणावं... आमची उपकरणं यापेक्षा मोठा वेग मोजू शकत नाहीत, आमची गणितं... यापेक्षा मोठा वेग हाताळू शकत नाहीत... हे जास्त योग्य नाही का ?

प्रकाशाचे स्वरूप घ्या. कणमय ? लहरीरूप ? कणांच्या लहरी? जर सूर्य व पृथ्वी यांच्यामध्ये काहीहि नाही तर मग हे लक्षावधी मैलाचं अंतर तोडून शक्ती पृथ्वीपर्यंत पोहचते कशी ? क्वांटा ? पण कशाच्या ? (मला वेड्यात काढा... पण माझं मन साधं आहे...)

किंवा द्रव्याचं रूप घ्या. क्रिष्टल. मॉलीक्यूल. अॅटम. इलेक्ट्रॉन.

हा आपला विचित्र इलेक्ट्रॉन. वागतो कसा ? एखाद्या कठीण कणासारखा द्रव्यावर आपटतो. इंपॅक्ट होतो. शक्तीचा उत्सर्ग होतो; पण तो कशाचा बनलेला आहे ? शक्तिद्रव्याचा ? पण म्हणजे काय ? ठीक आहे. त्याचं स्थान दाखवता येतं का ? नाही ! हायजेनबर्गचं ते प्रसिद्ध तत्व! अनसर्टनिटी ! द्रव्याची ? नाही ! आपल्या मनाची ! आत जाता जाता शेवटी सारं शून्यवत होऊन जातं... आणि यावर आपला सर्व पसारा

उभा केलेला आहे !

विश्वाच्या आकाराची मोजणी घ्या... ज्याच्या मर्यादा क्षणाक्षणाला सर्व बाजूंनी विलक्षण वेगाने वाढत आहेत असं एक चित्र ! क्षणभरही जे स्थिर राहत नाही त्याचं मापन करणार तरी कसं ?

या साऱ्या बाह्यसृष्टीचे आधार म्हणजे काही स्थिरांक... काही युनिव्हर्सल कॉन्स्टंटस् ! प्लँकचा कॉन्स्टंट. इलेक्ट्रॉनचा मास. प्रकाशाचा वेग. प्रकाशाची वेव्हलेंग्थ. एप्सायलम. नॅचरल लॉगरीथमचा बेस, यापैकी कशाला तरी भौतिक, सत्य, असा अर्थ आहे का ?

***

आज पुन्हा नवीन विचार येतात. यापूर्वी कोणाच्या ध्यानात हा प्रकार आला नाही का ? आला होता. रसेल आणि व्हाइट हेड यांनी शास्त्राच्या गणिती पायाची कसून तपासणी केली... आणि शेवटी त्यांना एक प्रत्यय आला... सर्व गणित ही एक पुनरुक्ती आहे... टॉटॉलॉजी आहे. एक अधिक एक म्हणजे दोन हे गृहित धरून आपण ते निरनिराळ्या रुपात मांडलं आहे; एक म्हणजे काय, अधिक म्हणजे काय, बरोबर म्हणजे काय याही सर्व व्याख्याच आहेत.

मला माफ करा. नाशाच्या कड्यावर लटपटणारा असा मी एक प्राणी आहे; पण हे विचार मला स्वस्थता लाभू देत नाहीत.

बाह्यसृष्टीच्या पडद्याआड डोकावण्याचा कोणी प्रयत्नच केला नाही का ? मला आता माझ्या वाचनातली एक मोठी उणीव जाणवली. ठराविक शास्त्रांच्या अभ्यासालाच मी स्वत:ला वाहून घेतलं होतं. मानवी विचारांची इतर दालनं मला कायमची बंद राहिली होती.

पण माझं जे काही थोडंबहुत वाचन झालेलं होतं. त्यावरून मला अशी शंका आली की हा विचार अनेक महान तत्वज्ञांच्या मनात यापूर्वीच येऊन गेलेला आहे. नाहीतर बाहेरची सत्यसृष्टी, तिच्या मानवी मनावर उमटणाऱ्या पडछाया आणि त्यातून निघणारे अर्थ व त्या अर्थामागची 'खरोखरची' किंवा 'मानवाशी संबंध नसलेली' परिस्थिती यांचा त्यांनी विचारच केला नसता. प्लेटो, कांट, हेगल, बर्कले हे पाश्चात्य तत्वज्ञ

किंवा भारतीय ऋषीमुनी, वेदकाळ, संतमहात्मे... या सर्वांनाच एक समान अनुभव आला होता. मानवाशिवाय जडसृष्टीला अस्तित्व नाही. जडसृष्टीचे परिणाम इंद्रियांद्वारे त्याच्या मनात उमटतात व तो बाहेरच्या निर्मितीला काही अर्थ देतो... हे असं परस्परावलंबी आहे. 'मी खरा व ब्रह्म खोटे' हा एक वाद पूर्वीपासून आहेच... 'मी आहे म्हणून ब्रह्म आहे' असाच त्याचा अर्थ होत नाही का ? एक प्रश्न असा होता की ज्याचं उत्तरच मिळण्यासारखं नव्हतं, तो प्रश्न हा होता... मानवाखेरीज बाह्यसृष्टीला काही अस्तित्व आहे का ? याची चाचणीही घेणं शक्य नव्हतं.

विचारांना कशी गोंधळलेली दिशा मिळत होती पहा !

याच तर्काच्या आणि तत्वज्ञानाच्या उन्मेषात मला आणखी एक विचार सुचला होता... तोही लिहून ठेवतो... वर मी जे एक खास परस्परावलंबीत्व दाखवले आहे त्याची दिशा कोणीकडून कोणीकडे आहे? आधी निर्मिती कशाची झाली ? विचाराची का सृष्टीची ?

आणखी एक चमत्कारिक विचार...

मानवजातीचे तथाकथित 'ज्ञान' ऐकीव स्वरुपाचे आहे. 'अ' अमूक एक गोष्ट एक सिद्धांताच्या रुपाने मांडतो. काही विशिष्ट अटी, नियमांनी ती सिद्ध करतो व 'ब' ते ग्राह्य दिसून चालतो. 'अ', 'ब', 'क', 'ड'... एक न संपणारी मालिका...

***

यानाचा प्रवास चाललाच होता. काही दिवसातच मंगळतळ २ येणार होता आणि याचवेळी माझ्या मनात 'कालगणनेचा' विचार आला. मानवाच्या शास्त्रातली ही एक आणखी विसंगती होती. 'काळ' ही कल्पना संपूर्ण आत्मनिष्ठ, व्यक्तिविशिष्ठ आहे. सर्व शास्त्रीय समीकरणात हा 't' तो... मानवाने आपल्या नकळत आपलं सर्व शास्त्र मानवविशिष्ट केलेलं आहे... मानवाशिवाय शास्त्राला अर्थ नाही...

कारण 'काला'चे स्वरूप मानवाला आकलन झालेलं नाही. एकाच ठराविक दिशेने घडत राहणाऱ्या घटना काल दर्शवितात. त्यावर मानवाचं कोणतेही नियंत्रण नाही. त्याचा स्थानिक 'काल' व इतरत्र घडणाऱ्या

घटनांचा 'काल' हे एकच आहेत का ? काही विशिष्ट नियमांनी संबंधित आहेत का ? पूर्ण स्वतंत्र आहेत का ? त्याला हे कधी कळणारच नाही ! पण मनात एक विचार येऊन गेला... 'काल' या समस्येचा मानवाला अर्थ समजला तर कदाचित् त्याच्याभोवतीचं हे स्वप्नकवच फोडण्यास त्याला मदत होईल !

आणि शेवटी तो विचार आलाच. कितीही दूर ठेवू म्हटलं तरी तो दूर राहणं शक्यच नव्हतं. खूप उंचीवर घिरट्या घालणाऱ्या हिंस्त्र पक्षासारखा तो मनाच्या पटलावर सारखा तरंगत होता आणि शेवटी त्याने मनावर झेप घातलीच...

मानव व त्याची सृष्टी जर स्वप्ननिर्मित असली तर मग...

हे कोणाचं स्वप्न आहे ?

जशी खरोखर आहे तशी, मानवविरहित पृथ्वी पहाण्याचं भाग्य (!) मला लाभलं होतं. हिरव्या नवलाईने नटलेल्या पृथ्वीची ती प्रतिमा माझा मेंदू जाळीत होती. आता मला एका गोष्टीचा राहून राहून पश्चात्ताप होत होता. मी तो देखावा बारकाईने पाहिला नव्हता. वृक्ष कोणत्या जातीचे होते, भूभाग कसा होता, हवा कशी होती... हे मला आता आठवत नव्हतं. स्मृती तेवढी शिल्लक होती.

त्यावरून शांत दिसणाऱ्या पृथ्वीवर काहीतरी होतं...

एखादा प्रचंड प्राणी ?

कीटकांची एखादी अजस्त्र सामूहिक अस्मिता ?

का आपल्या आकलनापलिकडचंच काहीतरी ?

आपल्याला शोध घ्यावा लागेल. आज ना उद्या ती वेळ येणारच आहे. हे स्वप्न किती वेळ चाललेलं आहे मला कल्पना नाही; पण ते कोणत्याही क्षणी भंगेल, आणि...

मानव, त्याची उत्तुंग नगरं, त्याच्या विशाल रचना... सर्वकाही साबणाच्या बुडबुड्यासारखं फटदिशी एका क्षणात नाहीसं होईल ! हाच विचार शरीराचा भीतीने थरकाप करून सोडतो, मन भीतीनं गोठून टाकतो, नजरेसमोर अंधारी आणतो...

'आयुष्य क्षणभंगूर आहे' आमचे संत आम्हाला सांगत आले

आहेत; पण किती क्षणभंगूर ! त्यांना तरी याची कल्पना होती का ?

मानव ! त्याचा गर्व ! त्याचा अभिमान ! त्याची करामत ? त्याची विश्वस्वामित्वाची भावना ! त्याच्या आकाशाला भिडणाऱ्या अपेक्षा !

हे काय आहे ? कोणत्या तरी एक अज्ञात मेंदूच्या पटलावर उमटणारी पातळ चित्रं आहेत !

त्याला स्वत:चं स्थान कळायला हवं. त्याने सावध व्हायला हवं.

त्याने शोध घ्यायला हवा.

शोधाचे मार्ग उपलब्ध आहेत. किती खुणा ! कितीतरी खुणा ! पण त्याने आजवर तिकडे लक्षच दिले नाही...' हा आत्मघातकी आंधळेपणा आता सोडला पाहिजे...

'तुमच्या विसंगतीचा अभ्यास करा...' किरकिट म्हणाले होते... 'तेथेच या जाळ्याचे सांधे आहेत... तेथेच जोड आहेत...

अर्थ नसणारे पण महत्त्वाचे स्थिरांक, ज्ञानाच्या खालच्या व वरच्या अलिखित पण असमर्थनीय मर्यादा, काळाची चमत्कारिक घटना, दूर अंतरावर स्थळ... काळाचं एकत्रिकरण... या व अनेक खुणा समोर फक्त आहेत... त्यांचा अभ्यास व्हायला हवा !

***

पुन्हा एकदा मला तो अनुभव आला. मला याचा अर्थच कळत नाही. या सूचना वेडाच्या कडेवर लटपटणाऱ्या मेंदूतून निघाल्यासारख्या वाटतात. किंवा स्वत:ला फसवण्याचाही हा एक प्रयत्न असेल.

मला कळत नाही. गेले काही दिवस माझे विचार मलाच स्पष्ट होत नाहीत. शरीरावर व मनावर असह्य ताण पडला आहे हे मलाही दिसतं. त्याचे परिणाम काय होतात हे मलाही माहीत आहे.

पुढे मी लिहीत राहणारच आहे; पण त्याचं स्वरूप काय असेल ते मला सांगता येत नाही. मन शाबूत असतानाच मी निरोप घेणार आहे.

श्री, हे सर्व तू वाचले असशील अशी मी आशा करतो. मला जे खरोखर लिहायचं होतं ते आता लिहून झालं आहे. पुढेही मजकूर आहे; पण त्याला फारसं महत्त्व देऊ नकोस. माझा स्वत:चाच त्यावर तितकासा

विश्वास नाही. खरं आणि खोटं यांच्यातली सीमारेषा माझ्यासाठी फार पुसट व्हायला लागली आहे. माझ्या मनावर जो ताण पडला तो असह्य होतो अशी मला भीती वाटते. तो अन्यायही होता... एकाच जीवाला हे सहन करायला लावणं हा खरोखरच अघोरीपणा आहे.

मला वेड लागलं आहे अशी समजूत करून घेऊ नकोस. मंगळतळावर पोहचल्यावर मी वेडा झालेला असेनही; पण अजून तरी माझ्या सर्व मानसिक शक्ती शाबूत आहेत. येथपर्यंत लिहिलेलं सर्व विचारांतीच लिहिलेलं आहे. यापुढे काय होईल ते मला सांगता येत नाही. मंगळतळावर पोहचेपर्यंत बुद्धी शाबूत राहील की नाही याबद्दल मी साशंक आहे.

इतर कोणाच्याही हाती पडण्यापेक्षा हे लिखाण तुझ्या हाती पडावं अशी माझी फार फार इच्छा आहे, श्री. आपल्या दोघांच्यात काहीतरी समान दुवे आहेत. तू मला पूर्वीपासून ओळखतोस. वरील सर्व वाचल्यावर तू एकदम एखादा अतिरेकी निष्कर्ष काढणार नाहीस. अशी मला आशा आहे. तुझ्याशी प्रत्यक्ष बोलणं जमणार नाही अशी मला धास्ती वाटते. तेव्हा हे अखेरचेच शब्द आहेत. तुझ्या हाती (व तुझ्याच हाती) हे कागद पडतील अशी मी व्यवस्था करीन.

***

मनावरचा एक मोठा बोजा उतरला आहे. आता हलकं आणि स्वतंत्र वाटतं. माझं भवितव्य ठरलेलंच आहे. त्या स्वप्न नगरात यापुढे मी राहू शकणार नाही. मानवांपासून मी एकदम वेगळा झालो आहे. अलग झालो आहे, अलिप्त झालो आहे आणि कदाचित मला माझा निर्णय घ्यावाही लागणार नाही. मला वाटायला लागलं आहे की माझी बुद्धी नेहमी ताळ्यावर नसते... मला भास व्हायला लागले आहेत.

यानात मी एकटा नाही. मध्यंतरी एकदा झोपेच्या ग्लानीत हा अनुभव आला होता. आता जागतेपणीही तो भास वारंवार होतो; पण मला भय वाटत नाही. त्यात भय वाटण्यासारखं काय आहे ? हे जे अस्तित्व माझ्या आसपास वावरत असतं ते इतकं शुद्ध आहे, इतकं उदात्त आहे की मन भारावून जातं... मनाला एक विलक्षण शांती मिळते... त्यावेळी तरी

असं वाटतं, आपण कशासाठी एवढी दगदग करतो ? शेवटी सर्व काही व्यवस्थित होणार आहे...

हा विचार मनात कोठून आला ? माझा तर धीर पार सुटला होता, मनावर वैफल्याचं दाट आवरण पसरलं होतं, मन खचून गेलं होतं...

त्यातून आशेचा हा सोनेरी किरण कसा आला ? का हा विचार माझा नाहीच ? मन क्षणभर थरारून उठलं... मी जरी त्या पोलादी, बंद यानात होतो तरी मन तेथून केव्हाच निसटलं होतं... ते पार, पार मागे गेलं होतं... मला एकदम लहानपणची एक आठवण झाली होती...

प्रचंड गाभाऱ्यात घुमणारा घंटानाद, आसपास दरवळणारा फुलांचा व उदबत्त्यांचा सुगंध, हजारो लोकांची गुणगुण...

एक देऊळ ! पण पूर्वी ! किती पूर्वी !

अधूनमधून ही भावना सारखी येत असते. कधी कधी वाटतं यानातल्या दिव्यातली ज्योत मुक्त होऊन माझ्या आसपास संचार करीत आहे... पण ती दाहक नाही, शीतल आहे, मनोहारी आहे...

मला माहीत आहे की हे सर्व भास आहेत; पण जर त्यापासून मला समाधान मिळत असेल, तर शहाणपणाचा लोखंडी मुखवटा कशासाठी हवा ? पृथ्वीवरचे असे किती दिवस मला राहिले आहेत ? मानवजातीचं ओझं मी इतके दिवस उरावर वागवलंच ना ? आता मन सुटकेसाठी तळमळत आहे... आता त्याला जाऊ दे ! स्वतंत्र होऊ दे !

शेवटी तो आवाज आला आणि तो अगदीच अनपेक्षित नव्हता. आश्चर्य वाटलं. ते त्याच्या मधुरपणाचं, गंभीरपणाचं, आपुलकीचं... नाजुक घंटांच्या किणकिण नादासारखा तो होता... मनात हळूवारपणे शिरणारा... मनात सामावून जाणारा...

'सर्व विचार केलेस तू, आर्य... पण एक नाही केलास...'

कोण बोलत आहे यावर मी विचारही केला नाही. कदाचित माझ्या अंतर्मनाला ते माहीतही असेल. मी काहीच बोललो नाही. (आणि बोलायची जरुरीही नव्हती...)

'तुला असं वाटतं की मानव केवळ स्वप्नरूप आहे ?'

पुरावाच तसा होता. माझा निरुपाय झाला होता.

'समजा असला; त्याने काही बिघडतं का ?'

किती चमत्कारिक प्रश्न ? याला काय उत्तर देणार ?

'स्वप्नालासुद्धा एक दिशा असते, एक भवितव्य असते, एक कर्तव्य असते... ते सारं पूर्ण व्हायला हवं ना ?'

मला आतल्याआत गलबलल्यासारखं होत होतं.

'मानवही आजवर स्वप्नच पाहत आला आहे. काही झोपेत आणि काही जागेपणी. ती याचीच प्रतिबिंब नसतील का ?'

मी अवाक् झालो होतो.

'दिक्पाल, स्वप्नात निर्मात्याचा काही ना काही अंश असतोच...' यानातला अवकाश प्रकाशमय झाला होता. माझी छाती धडधडत होती. शब्द यायच्या आधीच ते काय असणार याची मला कल्पना आली होती.

'दिक्पाल, मानवाला हा अंश कधीकधी जाणवला आहे.'

मला ते सहन होईना. विजेसारखी एखादी उत्पाती शक्ती शरीराच्या कणाकणातून धुमसत होती.

आपण... आपण... कोण आहात ? मनात प्रश्न थरथरला.

'मी सर्व काही आहे आणि सर्व काही नाही. मी सर्वत्र आहे आणि कोठेही नाही. दिक्पाल, निराश होऊ नकोस...'

वाद्याची अति पिळलेली तार जशी तुटावी तसं माझं भान हरपलं...

मी एकटा आहे. ती जळती भासरेषाही आता विझली आहे.

ते तरी खरं होतं का ? मला माहीत नाही.

हा अनुभव ज्याचा त्याच्यासाठी असतो.

जे काय राहिलं आहे ते.

काय करायचं ते मी ठरवलं आहे.

या कागदांचं ठिकाण श्रीला सांगेन...

आणि मग काळ्या अवकाशात...

मग पाहू या.

कदाचित तिथेही ती धगधगती ज्योत असेल.

निदान आमचे संत महात्मे तसं म्हणत आले आहेत.

मलाही शोध घ्यायला काही हरकत नाही.

एक खात्री आहे. भेट झालीच तर ती अत्यंत सुखकारक, मनाच्या सर्व शंकाकुशंका फेडणारी, आत्म्याला चिरशांती देणारी असेल.

मानव आणि त्याचं भवितव्य... ते म्हणाले होते.

कदाचित माझं भवितव्य ते असेल !

श्री, मी जातो.



# माझी टीप

मेजर दिक्पाल आर्य याचे हे भयानक हस्तलिखित असं होतं. मी ते सर्व एकदा, दोनदा, तीनदा वाचलं. मी त्यावरून काय निष्कर्ष काढला असेल तो सांगायला नकोच; पण त्या निष्कर्षापर्यंत येताना मन चाचरत होतं, कुरकुरत होतं...

हे उघड होतं की परिस्थितीच्या आणि अनुभवाच्या असह्य ताणाखाली त्याच्या मनात किंवा मेंदूत काहीतरी विकृती निर्माण झाली होती. मला याचं अतिशय वाईट वाटलं... एक तरुण, उमदं आयुष्य हकनाक बळी गेलं होतं... मानवाच्या प्रगतीची किंमत जर अशा अमूल्य वस्तूत मोजायची असली तर त्या प्रगतीला अर्थ तरी काय राहतो ?

पण हे लिहून झाल्यावर लहान लहान विचार चोरवाटांनी मनात शिरतात. ते विसरताही येत नाहीत आणि त्यांचं नीट स्पष्टीकरणही करता

येत नाही.

अन्नपाण्याशिवाय पाल मंगळावर सव्वीस दिवस कसा राहीला ? का तेथलंच काही खाणंपिणं (असलं तर !) केल्याने त्याच्यात ही भयानक विकृती निर्माण झाली ?

पण मन एवढ्यावरच थांबत नाही.

त्याने सर्व तथाकथित घटनांचं दिलेलं स्पष्टीकरण किती तर्कशुद्ध आहे ! इतकं की मला त्याची भीतीच वाटते !

दिक्पाल म्हणतो की त्याने थिऑरॉटिकल फिजिक्स आणि गणित याचा अभ्यास केलेला नाही. माझी समज तर त्याच्याहूनही कमी आहे; पण त्याने उभी केलेली समस्यांची रांग मला खरोखरच अस्वस्थ करते. यावर एखाद्या तज्ज्ञाशी केव्हातरी चर्चा केलीच पाहिजे... मला नाही वाटत आपल्या शास्त्रीय उपपत्तीत एवढा गोंधळ आणि विस्कळितपणा असेल...

मनात आणखी एक शक्यता येते. मंगळावर हे किरकिट असतीलही. त्यांनी सांगितल्याप्रमाणे बीजांवर किरणोत्सर्गाचा परिणाम होऊन त्यांची अनैसर्गिक वाढ झालेली असेलही... मग मानवांचं आक्रमण टाळण्यासाठी त्यांनीच हा सारा खटाटोप केला नसेल कशावरून ? त्यांची बुद्धिमत्ता इतकी तीव्र असली, आणि ते जर सामुदायिक अस्तित्व जगत असले (पृथ्वीवर तरी या जाती असे आयुष्य जगतात हा आपला अनुभव आहे !) तर मग पालसारख्या एकट्यादुकट्या मानवाला आपल्या अमलाखाली आणणं, त्याची स्वतंत्र बुद्धी निकामी करून त्याला मोहनावस्थेत नेणं मग त्याला ही अशी विपरीत रचना दाखवणं त्यांच्या आवाक्याबाहेरचं होतं का ? मला वाटत नाही. तेव्हा त्याच्या वृत्तांतातला अर्धा भाग मान्य करूनही बाकीच्या भागाचं स्पष्टीकरण देता येतं.

मंगळावर दुसरं यान जाईपर्यंत वाट पाहिली पाहिजे. मला वाटतं यावेळी ते एकटादुकटा मानव पाठवणार नाहीत. अनुभवाने शहाणं होण्याचा माणसाचा स्वभाव आहे. कदाचित कम्युनिकेशन ऑफिसर म्हणून माझीही टीममध्ये निवड होईल... आताच पुढचं काही सांगता येत नाही.

पण मन शेवटी पालकडेच परत येतं.

त्याच्यापुरती सत्यस्थिती बदलली होती. मानसिक उपचारांनी काही फायदा झाला असता की नाही हे आता अंदाजच आहेत.

त्याने एका वेगळ्याच मितीत प्रवेश केला आहे.

ईश्वर त्याच्या आत्म्यास शांती देवो, एवढी एकच प्रार्थना मनात आहे. सदिच्छेपलीकडे आपल्या हाती काय आहे ?

